हुतात्मा विष्णु गणेश पिंगळे स्मारक व्याख्यानमाला

पुष्प पहिले



# मुसलमानकालीन महाराष्ट्र



व्याख्याते

**प्रा. गणेश हरी खरे**

भा. इ. संशोधक मंडळाचे निवृत्त अधिरक्षक; मार्गदर्शक
अध्यापक, पदव्युत्तर विभाग, पुणे विद्यापीठ इ.

विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर

सन १९७६ ]  किंमत सहा रुपये  [ शके १८९७

प्रकाशक :

**ग. त्र्यं. देशपांडे**
विदर्भ संशोधन मंडळ,
पश्चिम हायकोर्ट मार्ग,
नागपूर–४४० ००१



मुद्रक :

**म. पां. बनहट्टी**
नारायण मुद्रणालय,
धनतोली, नागपूर–४४० ०१२

# प्रास्ताविक

नागपूरचे विख्यात डॉक्टर श्री. वसंत नरहर वांकर यांनी आपल्या मातुःश्री कै. सौ. लक्ष्मीबाई वांकर यांच्या स्मरणार्थ 'हुतात्मा विष्णु गणेश पिंगळे स्मारक व्याख्यानमाले'करिता कांही रक्कम मंडळाला देऊन 'ट्रस्ट' केला आहे. त्याच्या व्याजातून ही व्याख्यानमाला गुंफिली जात आहे.

भारताच्या स्वातंत्र्याकरिता ज्या शूर देशभक्तांनी सशस्त्र क्रांति करण्याचा प्रयत्न केला त्यांमध्ये हुतात्मा विष्णु गणेश पिंगळे हे प्रमुख होत. त्यांचे आरंभीचे शिक्षण प्रो. विजापूरकरांनी राष्ट्रीय शिक्षणाकरिता तळेगाव येथे स्थापिलेल्या समर्थ विद्यालयात झाले. विद्यार्थी दशेतच पिंगळे क्रांतिकारक बनले होते, पण इंजिनीयरिंगच्या शिक्षणाकरिता ते अमेरिकेस गेले आणि तेथील वॉशिंग्टन युनिव्हर्सिटीत त्यांनी प्रवेश मिळविला. तेथे त्यांनी त्यापूर्वी त्याच उद्देशाने तेथे गेलेले वैदर्भीय क्रांति-कारक डॉ. खानखोजे यांच्याशी संपर्क साधला. अमेरिकेतील भारतीय क्रांतिकारकांचे 'प्रचारक' व 'प्रहारक' असे दोन विभाग होते. पिंगळे 'प्रहारक विभागा'चे प्रमुख होते. पहिले जागतिक युद्ध सुरू होताच पिंगळे भारतात परत आले आणि राशबिहारींसारख्या येथील अनुभवी क्रांतिकारकांच्या सल्ल्याने त्यांनी अनेक ठिकाणी, विशेषतः हिंदी सैन्यांच्या छावण्यांतून, विद्रोह उत्पन्न करण्याचे कारस्थान रचले. पण इंग्रज सरकारने आधीच पेरून ठेवलेल्या गुप्त हेरांमार्फत त्याची बातमी फुटून पिंगळे पकडले गेले. त्यावेळी त्यांच्या जवळ मीरत छावणीतील खोलीत अर्धी रेजिमेंट उडवून देण्याइतके स्फोटक बॉंब सापडले होते. नंतर डिफेन्स् ऑफ इंडिया ॲक्टखाली त्यांच्यावर खटला सुरू होऊन त्यांत त्यांना फाशीची शिक्षा झाली. अनेकांनी त्यांना दयेचा अर्ज करण्यासाठी सुचविले; पण त्यांनी 'माझ्यासारख्या व्यक्तीने आपल्या साथीदारांना ज्या प्रकारचे मार्गदर्शन करणे आवश्यक होते तेच मी केले आहे' असे स्पष्ट सांगून

अर्ज करण्यास नकार दिला. क्लीव्हलंड साहेबाने त्यांच्या विषयी पुढील उद्‌गार काढले आहेत, ' मी अनेक हिंदी देशभक्त व क्रांतिकारकही जवळून पाहिले आहेत. पण पिंगळे यांच्याइतका थोर मनाचा क्रांतिदर्शी बुद्धिमत्तेचा व विशुद्ध चारित्र्याचा पुरुष पाहिला नाही. '

अशा थोर क्रांतिकारकाच्या स्मरणार्थ आयोजिलेल्या व्याख्यान-मालेचे पहिले पुष्प गुंफण्यास संशोधन क्षेत्रात तसेच अग्रेसर असणारे प्रा. ग. ह. खरे आम्हांस मिळाले आहेत. प्रा. खरे यांनी असहकारितेच्या चळवळीत भाग घेण्याकरिता महाविद्यालयाच्या प्रथम वर्षाच्या वर्गातून राजकारणात पदार्पण केले. त्याकरिता कारावासही सोसला. शेवटी इतिहास संशोधनास आपले जीवन अर्पण करण्याचे ठरवून ते पुण्याच्या भारत इतिहास संशोधक मंडळात प्रविष्ट झाले. गेली पंचेचाळीस वर्षे त्या मंडळाच्या सेवेत असताना त्यांनी प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन (मराठयांचा) इतिहास, वाङमय व भाषाशास्त्र, मुद्राशास्त्र, मूर्तिविज्ञान इत्यादि विविध विषयांवर मौलिक ग्रंथरचना केली आहे. संशोधनाकरिता इंग्रजी व संस्कृतप्रमाणे कानडी, फारसी, उर्दू वगैरे इतर भाषांचे ज्ञान मिळविले आहे. देशभर प्रवास करून ऐतिहासिक स्थानांचे निरीक्षण केले आहे. संशोधनाला आवश्यक अशी साधनसामग्री जमविली आहे आणि संशोधकांमध्ये आपले अग्रेसरत्व बुद्धिमत्तेने व दीर्घ परिश्रमाने प्रस्थापित केले आहे. मुसलमानकालीन महाराष्ट्राचे सर्वांगीण चित्र रेखाटण्यास त्यांच्यासारखा चतुरस्र संशोधक मिळणे कठीण होते. त्यांनी प्रस्तुत व्याख्यानमालेचे पहिले पुष्प गुंफून शुभारंभ केल्याबद्दल आमचे मंडळ त्यांचे ऋणी आहे.

प्रस्तुत व्याख्यानांचे सारांश घाईने छापावे लागले. त्यांची कच्ची मुद्रिते प्रा. खरे यांच्याकडे पाठविणे शक्य नव्हते. कांही महत्त्वाच्या अशुद्धींचा अंतर्भाव शुद्धिपत्रात केला आहे. त्याकडे वाचकांचे लक्ष वेधतो.

नागपूर
१ मार्च १९७६

**वा. वि. मिराशी**
कार्याध्यक्ष,
विदर्भ संशोधन मंडळ

**हुतात्मा विष्णु गणेश पिंगळे स्मारक व्याख्यानमाला**

# मुसलमानकालीन महाराष्ट्र

## १. इतिहासाची साधने

मी आज, उद्या व परवा **तीन व्याख्याने** देऊन त्या व्याख्यानांत ' मुसलमानकालीन महाराष्ट्र ' या विषयाची सर्वांगीण माहिती सांगण्याचा प्रयत्न करणार आहे. पैकी आज प्रथम या विषयाची साधने कोणती यावर बोलणार आहे. मुसलमानकालीन महाराष्ट्राची स्थिती कशा प्रकारची होती ? हा विषय चर्चिला जाणार हे श्रोत्यांच्या सहज लक्षात आले असेल. त्याचप्रमाणे मुसलमान काल म्हटला म्हणजे त्याच्या अभ्यासाची मुख्य साधने अरबी किंवा फार्सी भाषेत असणार अशी श्रोत्यांची कल्पना होणार हे उघड आहे. या कल्पनेप्रमाणे मुसलमानकालीन भारतीय इतिहासाची प्रमुख साधने अरबी व फार्सी या भाषांत आहेत याविषयी शंका नाही. पण या साधनांना पुष्कळच मर्यादा आहे. ऐने अकबरी सारखा ग्रंथ एखादाच असेल की ज्यात मुसलमानकालीन मुख्यतः राज्यकर्त्यांच्या जीवनाच्या अधिकांत अधिक अंगांची तपशीलवार माहिती आलेली आहे. पण असा एखादा ग्रंथ सोडला तर भारतीय इतिहास सांगणाऱ्या बहुतेक सर्व अरबी–फार्सी ग्रंथांत मुसलमानी कालात होऊन गेलेल्या मुस्लिम राज्यकर्त्यांच्या राजकीय इतिहासाविषयीच माहिती येते. राजजीवन किंवा लोकजीवन यांच्या विविध अंगांची माहिती आलेली नसते. यामुळे सर्वांगीण इतिहास लिहिण्यासाठी त्या ग्रंथांचा फारसा उपयोग होत नाही. त्याकरिता मुसलमानकालातही जे शासित फार मोठ्या प्रमाणात बहुसंख्य होते व ज्यांच्या भाषा भारतीय वंशांपैकी होत्या ते ग्रंथ पहावे लागतात. मुसलमानकालीन अभ्यासाविषयी या बाबतीत जी स्थिती उत्तरभारतात होती तीच परिस्थिती दक्षिण भारतातही होती. म्हणून महाराष्ट्रातील मुसलमानकालीन राजकीयेतर अंगांचा अभ्यास

करताना तत्कालीन महाराष्ट्राशी निगडित ज्या भाषा होत्या त्या भाषांतील हर प्रकारच्या वाङ्मयाचा अभ्यास करणे आवश्यक ठरते.

त्यांपैकी प्रमम मी अरबी, फार्सी व, उर्दू या भाषांतील आपणांस उपयोगी पडणाऱ्या साधनांची माहिती देतो. या कालाच्या इतिहासाला उपयोगी पडणारी अशी लिखित साधने दोन प्रकारची आहेत. एक अरबी–फार्सी–उर्दू ग्रंथ, आणि दुसरे, शिलालेख व कागदपत्रे. प्रथम मी ग्रंथांची माहिती देतो.

या कालाचा १६ व्या शतकाच्या अखेरचा इतिहास सांगणारा मुख्य ग्रंथ म्हणजे मुहम्मद कासिम हिंदू शाह फिरिश्ता याचा 'नवरसनामा' किंवा 'गुल्शन–इ–इब्राहीमी' हा होय. हा त्याने हि. १०१५ (इ. १६१२) पर्यंतची माहिती देऊन पुरा केला आहे. या ग्रंथात त्याने भारतामध्ये दक्षिणेत व उत्तरेत होऊन गेलेल्या झाडून साऱ्या मुसलमानी सल्तनतींची म्हणजे राजवंशांची माहिती दिली आहे. अशा प्रकारची व एवढी माहिती देणारा हा फार्सी भाषेतील एकमेव ग्रंथ असल्यामुळे त्याला अतिशय महत्त्व येणे अगदी स्वाभाविक होते. ग्रंथकर्त्याने आपल्या ग्रंथाच्या आरंभी आपण कोणकोणत्या ग्रंथांच्या साहाय्याने हा ग्रंथ लिहिला हे नमूद केले आहे. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी की, त्यांपैकी बहुतेक ग्रंथ आज अनुपलब्ध आहेत. शिवाय त्याने कोणत्या ग्रंथांवरून कोणता अंश उद्धृत केला हे सामान्यत: स्पष्ट केले नसल्यामुळे आधार–ग्रंथातील माहिती कोणती व ग्रंथकाराने स्वत: चौकशी करून मिळविलेली माहिती कोणती याचा उलगडा होत नाही. या ग्रंथकाराने आपल्या वयाची काही वर्षे आदिलशाही राजधानी विजापूर येथे, तर काही वर्षे निजामशाही राजधानी अहमदनगर येथे घालविली असल्याने त्याने आपल्या नजीकच्या पूर्व काळातील घडामोडींची माहिती वृद्धांच्याकडून मिळविली होती आणि काही घडामोडी त्याच्या हयातीत त्याच्या समोर घडलेल्या होत्या. यामुळे त्याच्या पुस्तकातील शेवटच्या ५० वर्षांची माहिती बरीचशी सत्याला धरून आहे असे म्हणण्यास हरकत नाही. पण त्या ५० वर्षांपूर्वीची माहिती कितपत सत्याधिष्ठित आहे हे सांगता येत नाही. अनेक बाबतीत त्याने



सांगितलेली माहिती पुढे दिलेल्या तबातबाई या ग्रंथकाराच्या माहितीशी जुळत नाही, जागोजाग विसंगती दृष्टीस पडते. त्याने उत्तर भारतातील राजवंशांची जी माहिती दिली आहे, तीमध्ये तर पुष्कळच चुका व विपर्यास आहेत असे त्या राजवंशांची माहिती देणाऱ्या अनेक विस्तृत ग्रंथांच्या अभ्यासाने आता कळून चुकले आहे. दक्षिणेतील त्याच्या पूर्वी सुमारे १०० वर्षे होऊन गेलेल्या बहमनी राजवंशाची अचूक वंशावळही त्यास देता आली नाही. एवढे सर्व असले तरी त्याच्या पुस्तकाचा आवाका फार मोठा असल्यामुळे त्याचे महत्त्व अजूनही टिकून आहे. या ग्रंथाचे अंशत: रूपांतर जोनाथन स्कॉट याने आपल्या हिस्ट्री ऑफ द डेक्कन या ग्रंथात केले असून तो १७९४ व १८०० या वर्षी अनुक्रमे श्रूजबरी व लंडन येथून प्रकाशित झाला आहे. तथापि या ग्रंथाचे कर्नल ब्रिग्ज यांनी केलेले समग्र भाषांतर चार भागात तीन वेळा (१८२९, १९०८ ते १०, १९६४ मध्ये) प्रकाशित झाले आहे.

या ग्रंथाचा मराठी सारांश श्री. बा. प्र. मोडक यांनी 'दक्षिणेतील मुसलमानी राज्यांचा इतिहास' भाग ३' या नावाने इ. १८९१ मध्ये प्रकाशित केला आहे. या ग्रंथाचा मूळ पाठ तारीख–इ–फिरिश्ता या नावाने प्रथम इसवी १८३२-३३ साली मुंबईत, आणि नंतर इ. १८६४-६५ व १८८४ मध्ये लखनौ व कानपूर येथील नवलकिशोर छापखान्याने प्रकाशित केला आहे. नवलकिशोर छापखान्याची छपाई व मांडणी अतिशय निकृष्ट दर्जाची आहे. याची अपूर्ण व पूर्ण उर्दू भाषांतरेही हि. १३०९ मध्ये नवलकिशोर प्रेसने आणि हैद्राबादच्या उस्मानिया विद्यापीठाने चार खंडात इ. १९२६ ते १९३२ या कालात प्रकाशित केली आहेत.

या कालाची माहिती देणारा जवळ जवळ फिरिश्त्याइतकाच महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे सय्यिद अली बिन अझीझुल्लाह तबातबाई हसनी याचा बुर्हान–इ–मासिर हा होय. हा प्रथम मुहम्मद कुली कुतबशाह याच्या आणि नंतर बुर्हान निजामशाह याच्या नोकरीत होता. त्याने हि. १००० (इ. १५९२) साली आपल्या ग्रंथाची रचना केली आणि त्यात पुढे हि. १००४ (इ. १५९६) पर्यंतच्या हकीकतीची भर घातली. नंतर

त्याच्या मुलाने याच ग्रंथामध्ये हिजरी १०३८ (इ. १६३६) येथपर्यंतची हकीकत समाविष्ट केली. मूळ ग्रंथ फिरिश्त्याच्या ग्रंथापूर्वी थोड्याच वर्षांत संपविला असल्यामुळे यात फिरिश्त्यानंतरच्या कालाची माहिती नाही. जी आहे ती त्यानंतरच्या लेखकाने नव्याने जोडलेली आहे. या ग्रंथात फिरिश्त्याप्रमाणे भारतातील सर्व मुसलमानी राजवंशांची माहिती आलेली नसून दक्षिणेत होऊन गेलेल्या केवळ बहमनी व निजामशाही या दोनच राजवंशांची माहिती दिलेली आहे. फिरिश्ता व तबातबाई यांनी दिलेल्या माहितींत पुष्कळ ठिकाणी तफावत आढळून आली आहे. यालाही बहमनी सुलतानांची प्रमाणभूत वंशावळ देता आली नाही. याचा मुळ फार्सी पाठ हैदराबाद येथील एका संस्थेने हि. १३५५ (इ.१९३६) या वर्षी प्रसिद्ध केला आहे. याचे इंग्रजी भाषांतर क्रमशः इंडियन अॅण्टिक्वरी या नियतकालिकाच्या क्रमांक २८ व ४९ ते ५२ या खंडांत अनुक्रमे मेजर किंग व सर वूल्स्ले हेग यांनी प्रसिद्ध केले असून पूर्वोक्ताचे स्वतंत्र पुस्तकही इ. १९०० मध्ये प्रकाशित झाले आहे. उत्तरोक्ताचे स्वतंत्र पुस्तक १९२३ साली प्रसिद्ध झाले. यांचे मराठी अनुवाद डॉ. भ. ग. कुंटे यांनी प्रथम 'अहमदनगरची निजामशाही' या नावाने व नंतर 'बहमनी राज्याचा इतिहास' या नावाने अनुक्रमे इ. १९६२ व इ. १९६६ या वर्षी प्रसिद्ध केले आहेत. या इंग्रजी व मराठी अनुवादांपैकी हेगने आपल्या अनुवादात जागोजाग पादटीपा देऊन ग्रंथकाराने किती, कोणत्या व कशा प्रकारच्या चुका केल्या आहेत हे अतिशय विस्ताराने दाखविले आहे. त्या सर्व टीपांचा साकल्याने विचार केला तर तो ग्रंथ शेकडो ठिकाणी अविश्वासार्ह आहे असे म्हणावयास हरकत नाही. डॉ. कुंटे यांनी केलेल्या अनुवादांच्या पुस्तकांतील अनेक दोषांपैकी सर्वांत मोठा दोष म्हणजे त्यांनी आपल्या पुस्तकांना जोडलेली परिशिष्टे व सूचि यांत कोणत्याही नोंदीपुढे तिचा पृष्ठांक दिला नसल्यामुळे ती सर्व अभ्यासकांच्या दृष्टीने निरुपयोगी ठरलेली आहेत. त्यांचे स्वरूप पाहिले म्हणजे अनुवादकर्त्याला सूचि कशा करावयाच्या असतात हेही ठाऊक नव्हते असे दिसून येते. तथापि, ज्यांना इंग्रजीचे ज्ञान नाही किंवा ते असूनही ज्यांना इंग्रजी ग्रंथ उपलब्ध नाहीत त्यांना या ग्रंथकाराने आपल्या मताने बहमनी व



निजामशाही वंशांचा जो खराखोटा, बरावाईट इतिहास दिला आहे तो जाणून घेण्याच्या दृष्टीने ती पुस्तके उपयुक्त आहेत. मात्र त्यांत आलेल्या व्यक्तिविषयक ग्रंथविषयक नामांच्या उच्चारांवर विश्वास ठेवणे धोक्याचे ठरेल. त्यांविषयी उचित सावधगिरी बाळगणे आवश्यक आहे.

या काळास उपयोगी पडणारा तिसरा फार्सी ग्रंथ तज्किरतुल्मुलूक हा होय. या ग्रंथाचा कर्ता रफीउद्दीन शीराझी हा आदिलशाही राजवटीत पहिला अली व दुसरा इब्राहीम या दोन सुलतानांच्या कारकीर्दीत कोठारी, खजिनदार, सचिव, विजापूरचा सुभेदार, टांकसाळेवरील मुख्याधिकारी, फिरता वकील इ. कामांवर होता. त्याने विजापूरच्या राजांचा आपल्या काळापर्यंतचा (ही. १०२०, इ. १६११–१२) थोडा बहमनी व पुष्कळ आदिलशाही यांचा इतिहास लिहिला आहे. या व उपर्युक्त दोन ग्रंथकारांचे वैशिष्टच असे की, हे तीन्ही ग्रंथकार जवळजवळ समकालीन असल्याने त्यांनी लिहिलेला इतिहास सामान्यतः एकाचवेळी संपतो. या ग्रंथाचा मूळ पाठ अंशतः हकीम शम्सुल्लाह कादिरी याने आपल्या तारीख या उर्दू नियतकालिकात बऱ्याच वर्षांपूर्वी प्रकाशित केला होत. संपूर्ण ग्रंथ अजून अप्रकाशितच आहे. या ग्रंथाचे अत्यंत त्रोटक, केवळ टिपणवजा रूपांतर मेजर किंग याने आपल्या बुर्हान–इ–मासिर या ग्रंथातील बहमनी वंशाच्या हकीकतीच्या अनुवादात दिले आहे.

या कालाच्या इतिहासास उपयोगी पडणारा आणखी एक ग्रंथ म्हणजे **इसामीचा** 'फुतूहुस्सलातीन' हा होय. हा ग्रंथ त्याने हि. ७५० (इ. १३४९) मध्ये पूर्ण केला. हा ग्रंथ पद्यरूप आहे. फिर्दौसीच्या शाहनाम्याप्रमाणे मी हा हिंदवी शाहनामा ग्रंथ करीत आहे असे त्याने आपल्या ग्रंथात सांगितले आहे. या ग्रंथामध्ये तुघलुक् घराण्यापैकी घियासुद्दीन व मुहम्मद तुघलुक् यांची उपर्युक्त वर्षापर्यंतची हकीकत, तसेच महाराष्ट्रात मुहम्मद तुघलुक् विरूद्ध झालेली बंडे आणि अलाउद्दीन हसन बहमनी याने केलेली स्वतंत्र राज्याची स्थापना यांच्या हकीकती विस्ताराने दिल्या आहेत. या ग्रंथाचा मूळपाठ प्रथम डॉ. महदी हुसैन यांनी १९३८ साली आग्र्याहून प्रकाशित केला आहे. त्यांत छपाईच्या पुष्कळ चुका झाल्या

आहेत. प्रो. उषा ह्यांनी मद्रास विद्यापीठातर्फे इ. १९४८ मध्ये प्रकाशित केलेला पाठ अधिक चांगल्या रीतीने छापलेला दिसतो. याचा इंग्रजी, टिपणींसह सारांश डॉ. महदी हुसैन यांनी अंशतः इ. १९६७ मध्ये प्रसिद्ध केला आहे.

या कालाची हकीकत देणारा आणखी एक ग्रंथ 'फुतुहाते आदिल-शाही' हा होय. याचा कर्ता फुझूनी अस्तराबादी. हा ग्रंथकर्त्याने प्रथम हि. १०५० (इ. १६४०) मध्ये संपविला; पण नंतर त्यांत आणखी चार वर्षांची हकीकत सामील करण्यात आली. तेव्हा यात हि. १०५४ (इ. १६४४) पर्यंतची हकीकत आली आहे असे समजले पाहिजे. याच्या कांही भागाचे इंग्रजी भाषांतर कमल कृष्ण बसू व सर जादुनाथ सरकार यांनी केले असून ते Journal of the Bihar and Orissa Research Society, डिसेंबर १९३८, च्या अंकात व इंडियन हिस्टोरिकल क्वॉटर्लीच्या नवव्या खंडात प्रसिद्ध झाले आहे.

या कालाचा इतिहास सांगणारा आणखी एक ग्रंथ म्हणजे बसातीनु-स्सलातीन हा होय. या ग्रंथाचा कर्ता मुहम्मद इब्राहीम अझ्झुबैरी हा आहे. हा ग्रंथ केंव्हा तयार झाला याचे नेमके वर्ष दिलेले नाही. पण ग्रंथकार एके ठिकाणी आज हा ग्रंथ संपविण्यास इंग्रजी राज्य सुरू होऊन (हि. १२३३, इ. १८१८) आठ वर्षे झाली असे सांगतो. म्हणून हा ग्रंथ हि. १२४१ (इ. १८२६) या साली पूर्ण झाला असे म्हणण्यास हरकत नाही. या ग्रंथकाराने आपल्या ग्रंथात फक्त आपल्या व्याख्यातांच्या कालास उपयोगी पडणाऱ्या अशा गुलशन–इ–इब्राहीमी, तज्किरतुलमुल्क मुहम्मदनामा, तबकात–इ–अक्बरी, गंजुल्–इस्रार, मल्फूजात, गंज–इ–उलूम इ. ग्रंथ पाहिले होते असे दिसते. या ग्रंथाचा मूळ पाठ हैदराबाद येथील सय्यिदी छापखान्यात हि. १३१४ (इ. १९३८) मध्ये प्रथम छापला गेला. या ग्रंथाचे निरनिराळे पाठ उपलब्ध आहेत. त्यांपैकी एका पाठाचे मराठी रूपांतर इ. १८८६ मध्ये बाळाजी प्रभाकर मोडक व दिनकर गोविंद वझे यांनी तयार करून 'विजापूरच्या आदिलशाही घराण्याचा इतिहास' या नावाने प्रकाशित केले आहे. या ग्रंथाचा नागरी



लिपीतील सारांश इ. १८९५ मध्ये पूर्णचंद्रोदय छापखान्यात छापून बडोदे येथे प्रसिद्ध झाला आहे. याचा नरसिंह विठ्ठल पारसनीस यांनी केलेला एक अनुवाद 'विजापूरची आदिलशाही' या नावाने श्री. वा. सी. बेंद्रे यांनी १९६८ साली मुंबईतून प्रकाशित केला आहे. याचे शिवकालापुरते भाषांतर श्री. ग. ह. खरे यांनी तयार केले व ते भा. इ. सं. मंडळाने 'शिवचरित्र–वृत्तसंग्रह' २ रा खंड या पुस्तकात इ. १९३९ मध्ये प्रकाशित केले.

मागे दिलेल्या ग्रंथांखेरीज निजामशाही व आदिलशाही या घराण्यांच्या इतिहासावर असे काही ग्रंथ आहेत की, ज्यांत काही राजकीय माहिती आलेली आहे किंवा आलेली असण्याचा संभव आहे. तथापि ते अप्रकाशित असल्याने त्यांचा सर्वसामान्य अभ्यासकांना उपयोग करता येत नाही. म्हणून त्या ग्रंथांविषयी मी येथे काही लिहीत नाही.

महाराष्ट्राचा मध्ययुगीन इतिहास लिहिताना दिल्लीच्या खलजी व तुघ्लुक या घराण्यांचा मुहम्मद तुघ्लुकापर्यंत महाराष्ट्राशी संबंध आल्याने या दोन घराण्यांच्या हकीकती ज्या ग्रंथांत आल्या आहेत ते ग्रंथ आपणांस उपयोगी आहेत. त्यापैकी दोन प्रमुख ग्रंथ म्हणजे तारीख–इ–फीरूझशाही व तबकात–ई–अक्बरी हे होत. याशिवाय खजायनुल् फुतूह, दवलरानी व खिज्रखां इ. ग्रंथही आपणास उपयुक्त आहेत. अशा बहुतेक ग्रंथांचे उणे अधिक उपयुक्त हिंदी अनुवाद अलीगढ विद्यापीठाने खलजीकालीन भारत, तुघ्लुककालीन भारत या नावांनी प्रसिद्ध केलेल्या ग्रथांत वाचावयास मिळतात.

तुघ्लुक घराण्यानंतर दिल्लीच्या सुलतानांचा महाराष्ट्राशी तुटलेला संबंध अकबराच्या कारकीर्दीत पुन्हा चालू झाला. अकबराने प्रथम गुजरात सुलतानांचे राज्य बुडविले. नंतर खानदेशातील फारूकी सुलतानांचे राज्य जवळ जवळ बुडवीत आणले आणि अहमदनगरच्या निजामशाही प्रदेशावर आक्रमण सुरू केले. जहांगीर व शाहजहान या अकबराच्या पुत्रपौत्रांनी अकबराचे धोरण पुढे चालवून निजामशाही पूर्णपणे बुडवून टाकली.

आणि बागलाणात राज्य करणाऱ्या राष्ट्रौढ वंशातील स्वसमकालीन वारसांना आपल्या वर्चस्वाखाली आणले. यामुळे अकबर, जहांगीर व शाहजहान यांच्या हकीकती ज्या मुधली ग्रंथात आल्या आहेत ते ग्रंथही आपणांस उपयुक्त आहेत. अशा ग्रंथांत तबकात-इ-अक्बरी, अक्बरनामा, तुझुक-इ-जहांगीरी, इक्बालनामा, मुन्त खबुत्तवारीख, बादशाहनामा, अमल-इ-सालिह इ. ग्रंथ प्रमुख आहेत. या ग्रंथांपैकी काहींचे शब्दशः अनुवाद झाले असून ते स्वतंत्र ग्रंथरूपाने प्रकाशित झाले आहेत; तर काहींचे सारांशरूप अनुवाद इलियट व डौसन यांच्या A History of India as told by its own Historians या मालेच्या ५, ६ व ७ या खंडांत प्रसिद्ध झाले आहेत. यांचे पुनर्मुद्रणही आज उपलब्ध आहे. अलीगढ विद्यापीठाच्या उपर्युक्त मालेत अजून अकबराविषयी माहिती यावयाची असल्याने त्या मालेतील ग्रंथ मध्ययुगाच्या उत्तरकालाचा इतिहास सांगण्यास उपयोगी पडणारे नाहीत. या सर्व मुधली ग्रंथांचा परामर्श घेणे स्वतंत्र बाब असल्याने मी त्यांचा प्रपंच करीत नाही.

या कालाच्या इतिहासकथनास उपयोगी पडणारे दुसऱ्या प्रकारचे साहित्य म्हणजे शिलालेख व कागदपत्रे. पैकी शेकडो शिलालेख एपिग्राफिया इंडो-मॉस्लेमिका आणि एपिग्राफिया इंडिका या नियतकालिकाचे ॲरेबिक व पर्शियन सप्लिमेंट यांत प्रसिद्ध झाले आहेत. त्यातील काही अंशाचे सार श्री. वा. सि. बेंद्रे यांनी आपल्या 'ए स्टडी ऑफ मुस्लिम इन्स्क्रिप्शन्स' या पुस्तकात दिले आहे. ते सार किंवा मूळ लेख यांचा अभ्यास केला तर त्यावरून आपणांस एखादी मशीद, दर्गा, किल्ला, त्याचे तट, बुरूज, कोणत्या सुलतानाच्या कारकीर्दीत कोणत्या अधिकाऱ्याने कोणत्या काळी केले व प्रत्यक्ष बांध काम करणारा कोण होता इ. अतिशय संकुचित माहिती मिळते. त्या लेखांवरून सामाजिक, आर्थिक इ. माहिती तर सोडाच; पण राजकीय माहितीही मिळू शकत नाही. क्वचित् प्रसंगी या शिलालेखांत सुलतानांनी काढलेल्या फर्मानांचे उतारे केलेले आढळतात. पण ती फर्मानेही फार महत्त्वाची आहेत असे दिसत नाही. क्वचित् काही शिलालेख हमरस्ते दाखविण्यासाठी लिहिलेले आहेत. अशा शिला-



लेखांत प्रथम फार्सी व नंतर मराठी मजकूर लिहिलेला आढळतो. यामुळे या शिलालेखांचा मुसलमानकालीन महाराष्ट्र समाजाचा सर्वांगीण इतिहास समजण्यास व्हावा तसा उपयोग होत नाही.

या कालास उपयोगी पडतील असे अस्सल फार्सी कागदपत्र उपलब्ध आहेत 'मुधोळच्या घोरपडे घराण्याचा इतिहास' यात या काळातील काही कागद प्रकाशित झाले आहेत. ते प्रकाशित होत असतानाच मला त्यांविषयी काही शंका येत होत्या त्या, त्या पुस्तकात या कागदांना दिलेल्या टीपांत, प्रकट केल्या आहेत. ते कागद अस्सल आहेत असे समजून डॉ. भा. आ. सालतूर यांनी त्यांवर एक लेख लिहिला. त्या लेखाच्या उत्तरात मी दाखवून दिले की, त्या कागदांतील माहिती फिरिश्त्याच्या माहितीशी इतकी मिळती जुळती आहे की, कोणीतरी एकाने दुसऱ्याची नक्कल केली हे स्पष्ट दिसते; आणि आता माझी खात्री झाली आहे की, त्या पुस्तकातील पहिले १० कागद निश्चयाने बनावट आहेत. त्या कागदांत दिलेली माहिती फिरिश्त्यामधून घेऊन तीस आपणास अनुकूल असे रूप दिले आहे. पुढील काही कागदांविषयी संशय आहे. सुमारे १० वर्षांपूर्वी आंध्रप्रदेश राज्याने त्याच्या लेखशाखेतील काही अतिशय जुने कागद "Farmans and Sanads of the Deccan Sultans" या नावाने प्रसिद्ध केले आहेत. ते बहुतांशी अस्सल आहेत अशी माझी आज समजूत आहे. पण त्यांत प्रसिद्ध केलेल्या ३५ कागदांपैकी सारे ६ कागद आपल्या कालातील आहेत. पुण्याच्या भारत इतिहास संशोधक मंडळानेही मुख्यतः ऐतिहासिक फार्सी साहित्य खंड ३ व ५ मध्ये या काळात पडणारे व अस्सल असे काही कागद प्रकाशित केले आहेत. पण या सर्व कागदपत्रांची संख्या पुरी शंभर देखील भरणार नाही. यामुळे या कागदांच्या सहाय्याने आपणांस या कालाविषयी विशेष लिहिता येईल असे दिसत नाही. सारांश या कालाला उपयोगी पडतील असे अस्सल फार्सी कागदपत्र प्रायः नाहीत असे समजण्यास हरकत नाही.

एतत्कालीन फार्सी पत्रव्यवहाराचा एक प्रकार आहे. त्यास आपण 'पत्रगुच्छ' म्हणू. मुसलमानी कालात कांही अमीर-उमरावांना किंवा

राजकारणसंबद्ध विद्वानांना सुलतान, बादशाह किंवा अमीर-उमराव यांनी लिहिलेली किंवा त्यांना आलेली पत्रे एकत्र करण्याचा रोक होता. अशा प्रकारे तयार केलेले अनेक पत्रगुच्छ आज ज्ञात आले आहेत. अशा सुमारे ५० पत्रगुच्छांपैकी चार-दोन पत्रगुच्छच मूळ किंवा भाषांतर स्वरूपात प्रकाशित झाले आहेत. हे पत्रगुच्छ तयार करण्याची प्रथा अला-उद्दीन खलजीच्या काळापासून सुरू होऊन ब्रिटिश आमदनी चालू होईतो प्रचलित होती. हे पत्रगुच्छ करणारांच्या मनात आजच्या पिढीला त्या त्या काळाचा बरावाईट इतिहास समजावा असा हेतू मुख्यत: नव्हता. त्यांच्या मनात लेखनपद्धती व वाङ्मयगुण कितपत आणि कशा प्रकारचे होते हे समजावे हा होता. यामुळे अशा पत्रगुच्छांतील पत्रांत भरपूर ऐतिहासिक माहिती सापडेलच याची खात्री नसते. याशिवाय या पत्र-गुच्छांतील आणखी महत्वाचा दोष असा की, यांतील बहुतेक पत्रांमध्ये मुळात असलेले कालनिर्देश गाळलेले आहेत. तसेच अगोदरच मूळ पत्र-व्यवहारात पुष्कळ वेळा लेखक व ग्राहक यांचे निर्देश नसतात. ज्या थोड्या पत्रांत असे निर्देश असण्याचा संभव त्यांतीलही निर्देश या पत्रगुच्छांत गाळलेले असतात. यामुळे या पत्रांचे लेखक व ग्राहक कोण तसेच यांचे काल कोणते हे ठरविणे म्हणजे एक डोकेदुखीच असते. त्याचप्रमाणे मूळ पत्रांच्या गर्भाचीही बिनचूक नकल अशा पत्रात केलेली नसते. यामुळे साधने म्हणून या पत्रगुच्छांना दुसरा दर्जा द्यावा लागतो. अशा पत्रगुच्छांपैकी बहमनी सल्तनतीतील एका वेळचा प्रख्यात मुख्य प्रधान महमूद गावान याच्या पत्रांचा एक गुच्छ 'रियाजुलइन्शा' या नावाने प्रकाशित झाला आहे. याचा उपयोग या कालावर लिहिणाऱ्या काही लेखकांनी केला आहे. पण याचा कोणत्याही परभाषेत अद्याप अनुवाद झालेला नाही. यामुळे सामान्य मनुष्यास या पत्रगुच्छांचा उपयोग करणे आज तरी शक्य होत नाही.

एतत्कालीन संस्कृत वाङ्मय पाहिले तर त्यात धर्मशास्त्रावरील थोडेसे ग्रंथ व निबंधग्रंथ यांचा मुख्य भरणा आहे. असे ग्रंथ म्हणजे दलपतरायाचा 'नृसिंहप्रसाद' परशुरामाची 'परशुरामपद्धति', कमला-



करभट्टाचा 'निर्णयसिंधु' इ. होत. यांत तत्कालीन ब्राह्मण विद्वानांच्या हिंदु धर्मातील आचार, विचार व व्यवहार यांविषयी कल्पना कोणत्या प्रकारच्या होत्या यांची माहिती मिळते. त्या वेळीही धर्मात अनेक दैनंदिन व्यवहारांचा समावेश केला असल्यामुळे त्या त्या व्यवहारांविषयी काही कल्पना बांधता येतात. पण त्यानेही तत्कालीन समाजाची सर्वांगीण माहिती मिळणे शक्य होत नाही. विश्वगुणादर्शचंपू हा एक निराळयाच प्रकारचा ग्रंथ आहे. या ग्रंथात भारतातील विविध देश, तसेच नद्या व तीर्थक्षेत्रे यांची वर्णने आहेत. या वर्णनांवरून चंपूसमकालीन भारतातील काही लोक कोणत्या प्रकारचे जीवन व्यतीत करीत होते याविषयी माहिती मिळते. त्यांत महाराष्ट्रवर्णनम् नावाचे एक ११ पृष्ठांचे प्रकरण आले आहे. यात मुख्यत: ब्राह्मण व क्षत्रिय कसे वागत होते याचे वर्णन आहे. त्यांत विश्वावसू व कृशानु यांच्या संवादरूपाने या वर्गांची निंदा व स्तुती आल्या आहेत. त्यामुळे महाराष्ट्रातील तत्कालीन ब्राह्मणादी चार वर्णांची कर्मे कशी चालत होती याची रूपरेषा आपणास समजते. या कालाच्या अंतिम भागास उपयोगी पडणारा असा एक बहुभाषिक ग्रंथ आहे. त्याचे नाव राधामाधवविलासचंपू त्यात निरनिराळया भाषांत शहाजीचे कार्य व ऐश्वर्य यांचे वर्णन केले आहे. तेवढयापुरता हा ग्रंथ आपणांस उपयोगी आहे.

या काळातील व दखनी हिंदी भाषेतील कांही कागद-ग्रंथ अलीकडे प्रसिद्ध झाले आहेत. ते प्राय: मुसलमान कवींनी रचलेले व अनैतिहासिक विषयांस वाहिलेले असे असल्यामुळे त्यांत इतिहासविषयक माहिती मिळण्याचा संभव नाही. धार्मिक व सामाजिक माहिती कांही अंशी मिळण्याचा संभव आहे. तथापी या ग्रंथाकडे त्या दृष्टीने अजून कोणी फारसे पाहिलेले नाही एवढे खरे.

या कालास उपयोगी पडणारी अस्सल समकालीन मराठी पत्र-व्यवहाररूप साधने आहेत का ? इ. १३ ते १५ या शतकांतील अशा प्रकारचे कागद प्राय: नाहीत. इ. १९३० मध्ये भारत इतिहास संशोधक मंडळाने शिवकालीन पत्रसार-संग्रह या द्विखंडात्मक ग्रंथात त्या वेळेपर्यंत प्रकाशित

झालेल्या व या कालातील म्हणून समजलेल्या सुमारे १०० कागदांचा सारांश दिला आहे. तो देताना अनवधानाने कांही कागदांचे सारांश देण्याचे राहून गेले आहे. तदनंतर मी ज्याप्रमाणे १६ व्या शतकातील फार्सी कागद प्रकाशित केलेल्याप्रमाणे मराठी कागदही प्रकाशित केले. अगदी अलिकडे महाराष्ट्र शासनानेही या शतकातील काही कागद प्रकाशित केले आहेत. पण या सर्वांची बेरीज १५० च्या पुढे जाईल असे वाटत नाही. शिवाय या कागदांतील दोन–तीन दोष लक्षात घेण्यासारखे आहेत. यांतील कांही कागद मुळ फार्सी कागदांचे उणे अधिक निर्दोष अनुवाद आहेत. यांतील दुसरे काही कागद नक्कल आहेत. अशा नक्कलरूप कागदांत आलेले कालनिर्देश अनेक ठिकाणी अचूक नसल्याचे आढळून आले आहे. यामुळे या १५० कागदांतीलही कांही कागद पुराव्याच्या दृष्टीने निरुपयोगी आहेत.

मराठी ग्रंथांचे दोन प्रकार केले पाहिजेत. एक तत्वज्ञानपर ग्रंथ व दुसरा लौकिकग्रंथ. मराठी तत्त्वज्ञानावरील ग्रंथांत मुख्य भरणा वेदान्त व भक्ती यांचे विवेचन करणाऱ्या ग्रंथांचा आहे. या ग्रंथांत समाजस्थिती येण्याचा संभव नाही. राहता राहिले लौकिक ग्रंथ. लौकिक ग्रंथ या शब्दांनी मला रुक्मिणी स्वयंवर, उषाहरण, पंचोपाख्यान, सिंहासनबत्तिशी, वेताळपंचविशी, शुकवहात्तरी इ. ग्रंथ अभिप्रेत आहेत. हे वैदिकधर्मीय व महानुभाव या दोघांनीही रचले आहेत. हे ग्रंथही संस्कृत मुळावर आधारलेले आहेत. यामुळे मुख्य कथाभाग यांत सामान्यतः संस्कृत प्रमाणेच असतो. पण जेथे काही लौकिक व्यवहारांची वर्णने करावयाची असतात तेथे हे ग्रंथकार स्वसमकालीन शब्द, व्यवहार, पदार्थ इ. घुसडून देतात. उदा. स्वयंवरानंतर जेवणाची पंगत बसली म्हणजे खाद्य पदार्थांचे परिगणन करताना जिलेबी, निरनिराळचा प्रकारचे भात इ. मुसलमानांच्या संसर्गाने बहुजन समाजात शिरलेले खाद्य पदार्थ समाविष्ट करतात किंवा लढाईचे वर्णन सुरू झाले म्हणजे मुसलमानांनी उपयोगात आणलेली तोफा, गुर्ज, गर्नाळा, होके इत्यादींचा उल्लेख करतात. तेव्हा असे जे लौकिक ग्रंथ आहेत ते समाजस्थिती कथन करण्याच्या दृष्टीने धर्मग्रंथांपेक्षा अधिक उपयोगी पडतात. त्यातल्या त्यात महिकावतीची बखर



हा ग्रंथ कोकणातील मुसलमानकालीन समाजस्थिती कथन करण्यास अधिक उपयोगी पडणारा आहे. महिकावतीच्या बखरी प्रमाणे ठाण्याच्या बिंब राजाची बखर तसेच कांही जुनी कुळकटे प्रकाशित झाली आहेत. पण त्यांत विश्वास ठेवण्यासारखी माहिती फार कमी असते. यामुळे त्यांचाही फारसा उपयोग होत नाही.

या कालाचा सर्वांगीण इतिहास समजण्यास आणखी एक महत्त्वाचे साधन आहे. ते म्हणजे प्रवासवृत्ते. या प्रवासवृत्तांचे या काळापुरते दोन भाग पडतात. एक म्हणजे मुसलमान प्रवाशांनी लिहिलेली प्रवासवृत्ते आणि दुसरा भाग युरोपीय प्रवाशांनी लिहिलेली प्रवासवृत्ते. मुसलमानी प्रवासवृत्तांत इब्नबतूता याचे ‘ रहला ’ हे पुस्तक आणि अब्दुर्रझ्झाक याचे मत्लअ–उस्–सअदैन ही दोन पुस्तके फार प्रसिद्ध आहेत. इब्नबतूता हा मूळचा आफ्रिकेच्या उत्तरेत असलेल्या तंजीरचा रहिवासी होता. त्याने १३२५ मध्ये प्रवासासाठी आपला देश सोडला आणि चीनपर्यंतच्या निरनिराळचा देशांची यात्रा करून १३४९ मध्ये आपल्या मातृभूमीस तो परत गेला. नंतर त्याने स्पेनची यात्रा केली आणि त्याने आपल्या या संपूर्ण यात्रेचे वर्णन करणारा ग्रंथ इ. १३५५–५६ मध्ये पुरा केला. हिंदुस्थानातही त्याने पुष्कळ भ्रमण केले आणि शेवटी तो मुहम्मद तुघ्लुकाचा सर न्यायाधीश बनला. हा अतिशय चौकस बुद्धीचा असल्यामुळे त्याने दिलेली माहिती बहुतांशी अचूक आहे. अब्दुर्रझ्झाक हा मूळचा अफगाणिस्तानातील हिरात या गावचा रहिवासी. अनेक प्रकारचे बरे–वाईट अनुभव घेत–घेत याने आपला भारताचा व इतर देशांचा प्रवास पुरा केला. या प्रवासात तो कित्येक दिवस विजयनगर येथे राहिलेला होता. तो १४८२ मध्ये मेला. त्याच्या पुस्तकातीलही हकीगत इब्नबतूता इतकी विश्वसनीय नसली तरी महत्त्वाची आहे यात शंकाच नाही. युरोपीय प्रवासवृत्तांची सुरवात निकितिन या रशियन प्रवाशाच्या प्रवासवृत्तापासून होते. लंडनच्या हक्लुइत सोसायटीने प्रवासवृत्तांची एक मोठी मालाच चालू ठेवली आहे. तीमध्ये आतापर्यंत सुमारे १२५ पुस्तके प्रसिद्ध झाली असून पुढील ग्रंथ प्रकाशित करण्याचे काम चालू ठेवले आहे.

याशिवाय युरोपीय विद्वानांनी एकेका प्रवाशाची स्वतंत्र प्रवासवृत्तेही प्रसिद्ध केली आहेत. तसेच निरनिराळ्या शतकांतील प्रवाशांविषयी स्वतंत्र पुस्तकेही शतकांशतकापुरती झालेली आहेत. या प्रवाशांपैकी आपणास उपयोगी प्रवासी म्हणजे डोमिंगो, पीज, बार्बोसा इत्यादी होत.

एकंदर परकीय प्रवाशांच्या प्रवासवृत्ताविषयी काही गोष्टी येथे सूचना रूपाने स्पष्ट केल्या पाहिजेत. प्रवासी मुसलमान असो किंवा युरोपीय ख्रिस्ती असो. ते संस्कृतीने व भाषेने भारतीय लोकांहून भिन्न होते. त्यांना येथील व्यक्तिनामे, स्थलनामे इत्यादींचे उच्चार नीट करता येत नसत. तसेच भारतीय संस्कृतीतील आचार-विचार त्यांना यथास्थित कळत होते असेही नाही. तेव्हा या दोन्ही प्रकारच्या प्रवाशांनी दिलेली माहिती नीट तपासून व सावधगिरीने उपयोगात आणावी लागते.

त्या सर्वांच्या याद्या येथे देणे उचित नाही. ती पुस्तके अभ्यासकाने स्वतंत्रतेने पाहण्याजोगी व अभ्यासण्यासारखीच आहेत. सेवेलच्या A Forgotten Empire (विजयनगर साम्राज्य) या ग्रंथात नुनीज, व पीज या दोघांच्या प्रवासवृत्तांचे विजयनगरपुरते अनुवाद आलेले आहेत.

या कालाच्या इतिहासकथनास उपयोगी पडणारे आणखी एक महत्त्वाचे साधन आहे. ते म्हणजे नाणी. मागे मी निर्देश केला आहे की, फिरिश्ता व ~~तबातबा~~/यांना बहमनींची वास्तव वंशावळ देता आली नाही. बहमनी सुलतानांची शेकडो सोने, रूपे व तांबे या धातूंची नाणी सापडली आहेत. त्या नाण्यात सामान्यत: राज्य करणारा सुलतान स्वत:चे व आपल्या बापाचे नाव तर देतोच; पण काही सुलतानांनी आपल्या आजोबाचेही नाव दिलेले आहे. शिवाय ज्या वर्षी नाणे पाडले ते हिजरी वर्षही दिलेले आढळते. यामुळे केवळ वास्तव वंशावळच मिळाली असे नसून निरनिराळ्या सुलतानांच्या कारकीर्दीही समजून आल्या. कारकीर्दी समजावून घेताना एक सावधानता अवश्य बाळगावी लागते. एखादा सुलतान मेल्याबरोबर तात्काळ त्याच्या नावाची नाणी पाडणे बंद होते असे नाही. तो मेल्यावरही काही काळ त्याच्या



नावाची नाणी पाडण्याचे काम चालूच राहते. आता या साधनाच्या बाबतीत एक वस्तुस्थिती अवश्य लक्षात ठेवली पाहिजे. ज्याप्रमाणे बहमनींची उपर्युक्त तीन धातूंची शेकडो नाणी सापडली आहेत त्याप्रमाणे बहमनींच्या मागून आलेल्या पांच घराण्यांतील सुलतानांची बहमनींप्रमाणे किंवा त्यांहूनही अधिक नाणी सापडावयास पाहिजेत. परंतु दु:खाची गोष्ट अशी की, बहमनींचे राज्य फुटून त्यातून ज्या पांच शाह्या निर्माण झाल्या त्यांपैकी एकही शाही अशी नाही की, जीमधील प्रत्येक सुलतानाची आणि तीही तिन्ही धातूंची नाणी सापडलेली आहेत. उदा. आदिलशाहीतील युसुफ, इस्माईल व पहिला इब्राहीम या तीन सुलतानांची नाणी अद्याप तरी मला आढळलेली नाहीत. शिवाय पुढील सुलतानांची जी नाणी आढळली ती मुख्यत: तांब्याची व थोडी रूप्याची सापडली आहेत. दुसरा इब्राहीम आदिलशाह याच्या कित्येक कागदांत होन व नवरस या दोन सोन्याच्या नाण्यांचा उल्लेख येतो. पण ती नाणी मात्र पहावयास मिळालेली नाहीत. याच्याच कागदांत रूप्याचा होन असा एक शब्दप्रयोग आला आहे. पण तोही पहावयास सापडलेला नाही. दुसरा मुहम्मद आदिलशाहाचे होन होते याविषयी शंकाच नाही. दुसऱ्या अली आदिलशाहच्या रूप्याच्या लाऱ्या उण्याअधिक प्रमाणांत सापडतात; पण शेवटच्या दोन सुलतानांची सोन्याची नाणी अद्याप पहावयास मिळालेली नाहीत. निजामशाही नाण्यांची अवस्था याहूनही असमाधानकारक आहे. मुर्तजा व बुर्हान अशा दोन सुलतानांची पण तीही केवळ तांब्याची नाणी पहावयास मला मिळाली आहेत. त्यांची रूप्याची व सोन्याची नाणी अद्याप तरी कोणास आढळलेली नाहीत. ही नाणीही निजामशाहीच्या उत्तरकालीन वंशजांची आहेत. जी स्थिती निजामशाही नाण्यांची त्याहून वाईट अवस्था बरीदशाही, इमादशाही, कुत्बशाही नाण्यांची आहे. वऱ्हाडातील इमादशाहीची नाणी किती व कोणत्या प्रकारची याचा प्राय: बोध होत नाही. काही नाण्यांवर एका बाजूस धावता सिंह काढलेला असून दुसऱ्या बाजूस एलिचपूर एवढेच लिहिलेले आढळले. बरीदशाहीची

कसलीही नाणी अद्याप आढळलेली नाहीत. कुत्बशाहीची पुष्कळ नाणी सापडली आहेत. पण त्यांतील बरीचशी उत्तरकालीन सुलतानांची आहेत. याचा अर्थ असा की, या कालास उपयोगी पडणारी दक्षिणेतील सुलतानांची नाणी आपणास फारशी माहिती देऊ शकत नाहीत. अशी आजची वस्तुस्थिती आहे.

---

# २. राजकीय परिस्थिती

इ. १२९४ मध्ये अलाउद्दीन खलजीने देवगिरीचा राजा रामचंद्र यादव यावर स्वारी करून त्याचा पराभव केला आणि मुसलमानी इतिहासकारांवर विश्वास ठेवायचा तर अगणित लूट घेऊन दिल्लीस परतला. या स्वारीमुळे रामदेवरावास दिल्लीच्या खलजी सुलतानांचे मांडलिकत्व पत्करावे लागले. मांडलिकाने एकदा तरी सुलतानाचे दर्शन घेणे जरूर असल्यामुळे रामदेवरावास दिल्लीस जाणे भाग पडले. तेथे तो काही काळ राहिल्यानंतर देवगिरीस परतला. अलाउद्दीन खलजीच्या कारकीर्दीत मलिक काफूरने दक्षिणेवर अनेक स्वाऱ्या केल्या. या स्वाऱ्यांत मांडलिक या नात्याने रामदेवरावाने मलिक काफूरला साह्य करणे आवश्यक होऊन बसले. रामदेवरावाच्या पश्चात त्याचा मुलगा शंकरदेव व जावई हरपालदेव हे दोघे सत्ताधारी बनले. या दोघांनाही खलजींचे मांडलिकत्व मान्य नव्हते. त्यांनी आपले स्वातंत्र्य टिकविण्याचा आटोकाट प्रयत्न केला; पण त्या प्रयत्नाला यश न येता त्यांना हार खावी लागली. एवढेच नव्हे तर त्या अयशस्वी प्रयत्नाचा एवढा विपरीत परिणाम झाला की, इ. १३१८ च्या सुमारास यादवांचे राज्य बुडाले व महाराष्ट्रांतील हिंदू राज्याची परंपरा खंडीत झाली.

यादवांचे राज्य बुडाल्यानंतर तात्काल येथे बहमनी राज्य स्थापन झाले नाही. काही वर्षे खलजी नंतर तुघ्लुक या दिल्लीच्या सुलतानांचा अंमल महाराष्ट्रावर चालू राहिला. पण दिल्लीहून दक्षिणेसारख्या लांबच्या ठिकाणी राज्य करणे अतिशय जलद दळणवळणाच्या साधनांच्या अभावी अशक्यच होते. यासाठी मुहम्मद तुघ्लुकाने आपली राजधानी दिल्लीहून हलवून दक्षिणेत देवगिरी म्हणजेच दौलताबाद येथे आणण्याचा प्रयत्न केला. पण त्यामुळे उत्तरेत बंडे उद्भवली. म्हणून त्याने दौलताबाद राज-

धानी करण्याचे सोडून पुन: दिल्लीच राजधानी केली; पण यामुळे दक्षिणेत बंडे उद्भवली. या बंडांची बातमी तो भडोचला वेढा घालून बसला असता त्यास समजली. म्हणून त्याने दोन सरदारांस दक्षिणेत पाठवून दिले. पण त्यांजकडून काहीच झाले नाही. उलट दक्षिणेतील मुसलमानांनी त्यावेळचा दक्षिणचा सुभेदार निजामुद्दीन यास कैद करून इस्माईल मख यास नासिरुद्दीन शाह अशी पदवी देऊन त्याची दौलताबाद येथे राज्यावर स्थापना केली. पण मुहम्मद तुघ्लुक भडोचहून त्याजवर चालून आल्यामुळे बंडखोरांचा पुढारी अलाउद्दीन हसन आणि इस्माईल मख यांना आपल्या बायकामुलांसह पळून कलबर्ग्याकडे यावे लागले. एवढे होते न होते तोच गुजराथेत मोठे बंड उत्पन्न झाल्यामुळे मुहम्मद तुघ्लुकाने इमादुल्मुल्क सरतीज, कवामुद्दीन, मलिक जौहर, शेख बुर्हान बिलारामी इत्यादींकडे दक्षिणेचा कारभार सोपवून मुहम्मद तुघ्लुक गुजराथेकडे निघून गेला. इकडे अलाउद्दीन हसनने येथील बंडखोरांच्या सहाय्याने सरतीजला ठार करून तुघ्लुकांचे सैन्य उधळून लावले. इस्माईल मख हा म्हातारा झाला होता. त्याला या वेळी कराव्या लागणाऱ्या हाल-चाली सोसण्यासारख्या नव्हत्या. म्हणून त्याने आपणहून येथील राज्यपद सोडून दिले व बंडखोरांनी अलाउद्दीन हसन यास ३–८–१३४७ रोजी राज्यावर बसविले आणि अशा रीतीने दक्षिणेत स्वतंत्र मुसलमानी राज्याची स्थापना झाली. अलाउद्दीन हसन हा मूलत: कोण व कोठील याविषयी निश्चयात्मक असे काही सांगता येत नाही. त्याचे संपूर्ण नांव अलाउद्दीन हसन गंगू बहमनी असे होते. या बाबतीत फिरिश्त्याचे म्हणणे असे की, हा प्रथम गंगरस नावाच्या ब्राह्मणाच्या घरी गुलाम होता. मराठी कागदपत्रांत काही ठिकाणी जुन्या हकिकती दिल्या आहेत. त्यांत हा गंगरस बेळगाव जिल्यातील अथणी, ऐनापूर या बाजूचा कुलकर्णी होता. गंगरस या नावातील अरस शब्दावरून हा मूळचा कर्नाटकी असावा याविषयी शंका राहात नाही. दुसरीही एक बाब यासंबंधी लक्षात ठेवण्यासारखी आहे ती ही की या अलाउद्दीन हसनने पहिले वहिले विजय मिळविले ते मिरजेच्या बाजूचे आहेत. यावरून अलाउद्दीन हसन मूळचा मिरजेच्या बाजूचा असावा असे वाटते. फिरिश्त्याच्या म्हणण्याप्रमाणे आपला मालक गंगरस याविषयी



कृतज्ञता व्यक्त करण्याकरता अलाउद्दीन हसनने आपल्या नावात गंगू हा शब्द घातला. सर बूल्स्ले हेग यांचे म्हणणे असे की, गंगू हा शब्द कैकू असाही वाचता येतो. आणि कैकू आस हे इराणातील एका पौराणिक राजाचे नांव असून कैकू हा त्याचा संक्षेप आहे. आता अलाउद्दीन हसनच्या वंशाला बहमनी हे नाव प्रथम नव्हते. अलाउद्दीन हसन व त्याचा मुलगा यांनी आपल्या नाण्यांवर बहमनशाह अशी उपाधि लावून घेतलेली आहे. या उपाधीवरून अलाउद्दीनच्या वंशाला बहमनी हे नाव पडले. उत्तरकालीन इतिहासकारांनी हा अलाउद्दीन थोर वंशातला आहे हे दाखविण्यासाठी बहमन या इराणी पौराणिक वीरापासून अलाउद्दीनपर्यंत २८ पिढ्यांची वंशावळ आपल्या कल्पनेतून तयार केली मला स्वत:ला सर बूल्स्ले हेग यांचे म्हणणे किंवा ही वंशावळ यांवर विश्वास ठेववत नाही. माझा कल फिरिश्त्याने व रफीउद्दीन शीराझीने सांगितलेली गुलामाची हकीकत अधिक विश्वास्य मानण्याकडे आहे.

अलीकडचे शेरवानीसारखे इतिहासकारही गंगू या शब्दाच्या वर्चस्वापासून सुटू शकले नाहीत. हेही पाहण्यासारखे आहे. असो. बहमनी सुलतान. त्यांची एकमेकांशी नाती व त्यांचे राज्यकाल असे:–

१. अलाउद्दीन हसन बहमनशाह–१३४७ऑगस्ट ३–१३५८ फेब्रुवारी ११.
२. १ ला मुहम्मद=१ चा मुलगा–१३५८ फेब्रु. ११–१३७५ एप्रिल २१.
३. अलाउद्दीन मुजाहिद = २ चा मुलगा–१३७५ एप्रिल २१–१३७८ एप्रिल १६; खून.
४. दाऊद = २ चा पुतण्या–१३७८ एप्रिल १६–१३७८ मे २१; खून.
५. २ रा मुहम्मद = ४ चा भाऊ–१३७८ मे २१–१३९७ एप्रिल २०.
६. घियासुद्दीन तहम्तान = ५ चा मुलगा–१३९७ एप्रिल २०–१३९७ जून १४.
७. २ रा शम्सुद्दीन दाऊद = ६ चा भाऊ-१३९७ जून १४–१३९७ नोव्हेंबर–१६; डोळे काढले.
८. ताजुद्दीन फीरूझ = २ चा पुतण्या–१३९७ नोव्हेंबर १६–१४२२ सप्टेंबर २२.

९. १ ला शिहाबुद्दीन अहमद=८ चा भाऊ–१४२२ सप्टेंबर २२–१४३६ एप्रिल १७.

१०. २ रा अलाउद्दीन अहमद = ९ चा मुलगा–१४३६ एप्रिल १७–१४५८ मे ७.

११. अलाउद्दीन हुमायून शाह = १० चा मुलगा–१४५८ मे ७–१४६१ सप्टेंबर ४; खून.

१२. ३ रा अहमद निजामुद्दीन = ११ चा मुलगा–१४६१ सप्टेंबर ४–१४६३ जुलै ३०; अकस्मात मृत्यू.

१३. ३ रा शम्सुद्दीन मुहम्मद = १२ चा भाऊ १४६३ जुलै ३०–१४८२ मार्च २६.

१४. शिहाबुद्दीन महमूद = १३ चा मुलगा–१४८२ मार्च २६–१५१८ डिसेंबर ७.

१५. ४ था अहमद = १४ चा मुलगा–१५१८ डिसेंबर १५–१५२० डिसेंबर १५.

१६. अलाउद्दीन शाह = १५ चा मुलगा–१५२० डिसेंबर २८–१५२३ मार्च ५.

१७. बलियुल्लाह = १५ चा भाऊ-१५२३ मार्च ५–१५२६.

१८. कलीमुल्लाह = १५ चा भाऊ–१५२६–१५३८.

वर जी सूचि दिली आहे तीवरून आपल्या लक्षात येईल की या बहमनी वंशात एकंदर १८ राजे होऊन गेले व त्यांनी सुमारे १९० वर्षे राज्य केले. यांपैकी तिघांचे (३, ४, ११ चे) खून झाले. दोघांचे डोळे काढून (६, ७) त्यांस राज्यपदास निकामी केले होते. एक (१२) अल्पायुष्यी ठरला. शेवटचे चार केवळ नामधारी होते. सारांश, या अठरा सुलतानांपैकी आठच काय ते कर्तबगार निघाले. शेवटच्या चार सुलतानांच्या कारकीर्दीत त्या राज्याची पांच शकले होऊन बीदरची बरीदशाही, अहमदनगरची निजामशाही, विजापूरची आदिलशाही, वऱ्हाडमध्ये एलिचपुरास इमादशाही आणि गोवळकोंड्यास कुत्बशाही अशा पांच



शाह्या दक्षिणेत उत्पन्न झाल्या. तसेच अलाउद्दीन हसनने स्वातंत्र्य पुकारल्यानंतर काही वर्षांनी खानदेशात थाळनेर येथे राजा अलीखान फारूकी याने फारूकी वंशाचे राज्य स्थापन केले. ही मुसलमानी राज्ये झाली. याबरोबरच बागलाणच्या प्रदेशात राठोड वंशातील एका पुरुषाने आपली सत्ता स्थापन केली. या वंशातील राजे व त्यांचे राज्यकाल असे:–

## अहमदनगरचे निजामशाह व त्यांचे राज्यकाल

१. अहमद–१४९०–१५०९

२. १ ला बुर्हान (१ चा मुलगा)–१५०९–१५५३ डिसेंबर ३०; पोटशूळ.

३. १ ला हुसैन (२ चा मुलगा)–१५५३ डिसेंबर ३०–१५६५ जून ६.

४. १ ला मुर्तजा (३ चा मुलगा)–१५६५ जून ६–१५८८ जून १४; गुदमरून मारले.

५. २ रा हुसैन (४ चा मुलगा)–१५८८ जून १४–१५८९ एप्रिल १; खून.

६. इस्माईल (२ ऱ्या बुर्हानचा मुलगा)–१५८९ एप्रिल १–१५९१ मे ७; पदच्युत.

७. २ रा बुर्हान (४ चा भाऊ)–१५९१ मे ७–१५९५ एप्रिल २८.

८. इब्राहीम (७ चा मुलगा)–१५९५ एप्रिल २८–१५९६; युद्धात मरण.

९. बहादुर (८ चा मुलगा)–१५९६–१६०३; कैद.

१०. २ रा मुर्तजा (शहीद अलीचा मुलगा)–१६०३–१६३०.

११. ३ रा हुसैन (१० चा मुलगा)–१६३०–१६३६.

या निजामशाहीत ११ सुलतान झाले. पैकी ४ था सुलतान १ ला मुर्तजा याने आपला मुलगा २ रा हुसैन याला जाळून मारण्याचा प्रयत्न केला; पण त्यातून तो बचावला आणि पुढे त्याने बापाला तापलेल्या कोठडीत कोंडून मारले. पुढे या २ ऱ्या हुसैनचा खून झाला. ६ वा सुलतान इस्माईल याला २ वर्षांतच पदच्युत केले. ९ वा सुलतान बहादुर व ११ वा सुलतान ३ रा हुसैन यांना कैदेत पडावे लागले.

## विजापूरचे आदिलशाह व त्यांचे राज्यकाल

१. युसुफ–१४९०–१५१०
२. इस्माईल (१ चा मुलगा)–१५१०–१५३४ ऑगस्ट २७.
३. मल्लू (२ चा मुलगा)-१५३४ ऑगस्ट २७–१५३५ मार्च; पदच्युत
४. १ ला इब्राहीम (३ चा भाऊ)–१५३५ मार्च–१५५८.
५. १ ला अली (४ चा मुलगा)–१५५८–१५८० एप्रिल ९; खून.
६. २ रा इब्राहीम (५ चा पुतण्या)–१५८० एप्रिल ९–१६२७ सप्टेंबर १२.
७. मुहम्मद (६ चा मुलगा)–१६२७ सप्टेंबर १२–१६५६ नोव्हेंबर ४.
८. २ रा अली (७ चा मुलगा)–१६५६ नोव्हेंबर ४–१६७२ नोव्हेंबर २४.
९. सिकंदर (८ चा मुलगा)-१६७२ नोव्हेंबर २४–१६८६; कैद.

आदिलशाहीत ९ सुलतान झाले. पैकी ३ रा सुलतान मल्लू याला १ वर्षातच पदच्युत केले. ५ वा सुलतान १ ला अली याचा खून झाला. ९ वा सुलतान सिकंदर औरंगजेबाच्या कैदेत मेला.

## खानदेशचे फारूकी सुलतान व त्यांचे राज्यकाल

१. राजा अहमद / मलिकराजा–१३८२–१३९९ एप्रिल २९.
२. नसीरखान (१ चा मुलगा)–१३९९ एप्रिल २९–१४३७ सप्टेंबर २०
३. १ ला आदिलखान (२ चा मुलगा)–१४३७ सप्टेंबर २०–१४४१
४. मुबारकखान चौकंदा (३ चा मुलगा)–१४४१–१४५७ जून ५
५. २ रा आदिलखान, आयना (४ चा मुलगा)–१४५७ जून ५–१५०१ सप्टेंबर २८
६. दाऊदखान (५ चा भाऊ)–१५०१ सप्टेंबर २८–१५०८
७. गझनीखान (६ चा मुलगा)–१५०८–१५०८
८. हसनखान (६ चा भाऊ)–१५०८–१५०८
९. खानजहान (७ चा भाऊ)–१५०८–१५०८
१०. आलमखान (९ चा लांबचा भाऊबंद)–१५०८–१५०९



११. ३ रा आदिलखान (आलमखान)–१५०९–१५२० ऑगस्ट २५.
१२. मीरान मुहम्मद शाह (११ चा मुलगा)–१५२० ऑगस्ट २५–१५३७.
१३. अहमदशाह (१२ चा मुलगा)–१५३७–१५३७.
१४. २ रा मुबारकशाह (१२ चा भाऊ)–१५३७–१५६६.
१५. २ रा मुहम्मदशाह (१४ चा मुलगा)–१५६६–१५७६.
१६. हसनशाह (१५ चा मुलगा)–१५७६–१५७६ पदच्युत.
१७. ४ था आदिलखान राजा अलीखान (१५ चा भाऊ)–१५७७–१५९७.
१८. बहादुरशाह (१७ चा मुलगा)–१५९७–१६०१.

फारूकी घराण्यात एकूण १८ सुलतान झाले. त्यापैकी एकटया १५०८ या वर्षात ६ ते १० असे ५ सुलतान एकामागून एक होऊन गेले. १५३७ या वर्षात १२ ते १४ असे ३ सुलतान गेले व आले. १५७६ व ७७ या दोन वर्षात १५ ते १७ असे ३ सुलतान झाले. यावरून या घराण्यात काय झाले असेल याची कल्पना येते.

## वऱ्हाडचे इमादशाह व त्यांचे राज्यकाल

१. फतहुल्लाह–१४९०–१५०४ / १०.
२. अलाउद्दीन (१ चा मुलगा)–१५०४ / १०–१५२९ / ३०.
३. दर्या (२ चा मुलगा)–१५२९ / ३०–१५६१ / ६२.
४. बुर्हान (३ चा मुलगा)–१५६१ / ६२–१५७४; कैद.
५. तुफालखान (गादी बळकावू)–१५७४; कैद.

बहमनी राज्याचे ५ तुकडे होऊन ५ शाह्या उदयास आल्या. त्यांतील एक इमादशाही होय. ही सर्वात अल्पायुषी ठरली. याचे मुख्य कारण अकबराचा राज्यविस्ताराचा प्रयत्न हे होय. मुघली राज्याला इमादशाही राज्य अगदी जवळ असल्यामुळे, ते अकबराच्या कचाटचात त्याच्या पहिल्या २० वर्षातच सापडले आणि त्याचा विनाश झाला. ४ व ५ हे सुलतान मुघलांच्या कैदेत होते.

## बीदरचे बरीदशाह व त्यांचे राज्यकाल

१. अमीर कासिम–१४८७–१५०४.

२. अमीर अली (१ चा मुलगा)–१५०४–१५४२ /४३.

३. १ ला अली (२ चा मुलगा)–१५४२ /४३–१५७९ /८०.

४. इब्राहीम (३ चा मुलगा)–१५७९ /८०–१५८६ /८७.

५. २ रा कासिम (४ चा मुलगा ? / भाऊ)–१५८६ /८७–१५९१ /९२.

६. अमीर (३ चा पुतण्या ?)–१५९१ /९२–१६००; पदच्युत

७. मिर्झा अली (६ चा भाऊ /मुलगा ?)–१६००–१६०९.

८. २ रा अली (७ चा मुलगा ?)–१६०९–१६१९.

बीदरची बरीदशाही ही बहमनीच्या ५ तुकडयांपैकी एक होय. शेवटचे बहमनी सुलतान बीदर येथून राज्य करीत असता ही उदयास आली. पण हिची वाढ बहमनी वृक्षाच्या छायेत व्हावयाची असल्यामुळे ती झाली नाही. तथापि, ती १६१९ पर्यंत तगली हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. या शाहीतील शेवटचे ५ सुलतान ३३ वर्षात होऊन गेले. पैकी ६ वा सुलतान अमीर हा पदच्युत झाला.

## गोवळकोंडयाचे कुत्बशाह व त्यांचे राज्यकाल

१. सुलतान कुली–१५१२ – १५४३ सप्टेंबर २३ /३; खून.

२. जमशीद यार कुली (१ चा मुलगा) १५४३ सप्टेंबर २ /३ – १५५० जानेवारी २२.

३. सुब्हान कुली (२ चा मुलगा,–१५५० जानेवारी. २२–१५५० सप्टेंबर २७ / आक्टोबर २८; पदच्युत.

४. इब्राहीम कुली (२ चा भाऊ)–१५५० सप्टेंबर २७ /आक्टोबर २८ १५८० मे ६ / जून ६.

५. मुहम्मद कुली (४चा मुलगा)–१५८० मे ६ / जून ६–१६१२ जानेवारी ११.



६. मुहम्मद (५ चा पुतण्या)–१६१२ जानेवारी ११ – १६२६ जानेवारी ३१.

७. अबदुल्लाह (६ चा पुतण्या)–१६२६ जानेवारी ३१ – १६७२ एप्रिल ४.

८. अबुल हसन (१ च्या चुलत भावाचा नातु / ७ च्या मुलीचा मुलगा)– १६७२ एप्रिल ३१ – १६८० सप्टेंबर १७ कैद; मृत्यु १७००; दौलताबाद किल्ला.

बहमनीच्या ५ तुकडयांपैकी गोवळकोंडयाची कुत्बशाही हा एक तुकडा होय. महाराष्ट्राच्या मध्ययुगीन इतिहासाशी या शाहीचा घनिष्ठ-संबंध येत नाही हे खरे असले तरी महाराष्ट्रातील आदिलशाही/या दोन शाह्यांशी या शाहीचे शत्रुमित्रत्वाचे संबंध आल्यामुळे तिची वंशावळ येथे दिली आहे. हिच्या सुलतानापैकी १ ल्याचा खून झाला, ३ ऱ्याला पदच्युत केले आणि ८ वा मुघलांच्या कैदेत मरण पावला.

## बागलाणातील बागुलवंशी राजे व त्यांचे राज्यकाल

१. भैरव–इ. १५३० ते १५५५.

२. जयदर्ण (१ चा मुलगा)–इ. १५५५ ते १५८०.

३. वीरसेन / वीरमशाह (१ चा मुलगा)–इ. १५५५ ते १५८०.

४. नेमदेव / वीरमशाह (१ चा मुलगा) इ. १५५५ ते १५८०.

५. नारायणशाह / वीरमशाह (१ चा मुलगा)–इ. १५५५ ते १५८०.

६. ह्याउदेव / वीरमशाह (१ चा मुलगा)–इ. १५५५ ते १५८०.

७. लक्षधीर / वीरमशाह (१ चा मुलगा)–इ. १५५५ ते १५८०.

८. अंबदेव / वीरमशाह (१ चा मुलगा)–इ. १५५५ ते १५८०.

९. प्रतापशाह (पाचचा मुलगा)–इ. १५८० ते १६०५.

१०. हरिहर (पाचचा मुलगा)–इ. १५८० ते १६०५.

११. चतुर्भुज (पाचचा मुलगा)–इ. १५८० ते १६०५.

१२. राजसिंह (पाचचा मुलगा)–इ. १५८० ते १६०५.

१३. भैरवसेन / भैरव (९ चा मुलगा)–इ. १६०५ ते पुढे.

या घराण्याची मोठी लांबलचक वंशावळ 'राष्ट्रौढ–वंश–महाकाव्य' या प्रकाशित ग्रंथात (गायकवाड ओरिएंटल सिरीज, क्रमांक ५) दिली आहे. त्या संपूर्ण वंशावळीवर पूर्णतया विश्वास ठेवणे अशक्य आहे. म्हणून ती संपूर्ण वंशावळ येथे न देता शेवटच्या चार पिढ्यांचीच वंशावळ येथे दिली आहे. या वंशावळीतील शेवटचा पुरुष भैरव हा शाहजहानच्या आरंभीच्या काळात जिवंत होता. तेव्हा मी दिलेला मुळ पुरुष भैरव त्या पूर्वी सुमारे शंभर वर्षे होऊन गेला असे समजण्यास हरकत नाही. म्हणजे त्याचा काल इसवी १५३० चा सुमार येईल. या वंशातील मी दिलेल्या पुरुषांचे फुटकळ उल्लेख विविध फार्सी ऐतिहासिक ग्रंथात आले आहेत. पण शेवटचा जो भैरव त्याचे व त्याच्या मुलाचे निर्देश ऐतिहासिक फार्सी साहित्य खंड २ मध्ये आले आहेत. त्यांवरून शेवटचा भैरव निदान इसवी १६३८ पर्यंत तरी हयात होता असे दिसते. या घराण्याचे काही शिलालेख नाशिक जिल्ह्यातील हातगड, गाळणा, इत्यादी किल्लयांमध्ये आहेत. त्यांचे संशोधन अद्याप व्हावयाचे आहे. ते झाल्यावर कदाचित पहिल्या भैरवाच्या अगोदरच्या दोन तीन पिढ्या समजतील असे वाटते.

मागे मी बहमनी, निजामशाही, आदिलशाही, फारूकी, इमादशाही, बरीदशाही व कुत्बशाही अशा ७ महाराष्ट्रावर राज्य करणाऱ्या मुसलमान घराण्यांच्या वंशावळी व त्यांत होऊन गेलेल्या सुलतानांचे राज्यकाल आणि विशेष रीतीने मरण आले असल्यास त्या मरणाचे कारण ही दिली आहेत. त्यांचा संकलित सारांश येथे देतो.

| वंश | राज्यकाल | एकंदर वर्षसंख्या | सुलतान संख्या | सरासरी राज्यकाल |
|---|---|---|---|---|
| १. बहमनी | १३४७–१५३८ | १९१ | १८ | १०॥ |
| २. निजामशाही | १४९०–१६३६ | १४७ | ११/१२ | १२ |
| ३. आदिलशाही | १४९०–१६८६ | १९७ | ९ | २२ |
| ४. फारूकी | १३८२–१६०१ | २२० | १८ | १२ |
| ५. इमादशाही | १४९०–१५७४ | ८५ | ५ | १७ |
| ६. बरीदशाही | १४८७–१६१९ | १३३ | ८ | १७ |
| ७. कुत्बशाही | १५१२–१६८७ | १७६ | ८ | २२ |

मागे दिलेल्या माहितीवरून आपणास दिसून येईल की एक आदिलशाही व कुत्बशाही सोडून दिल्यास एकेका सुलतानाच्या वाट्यास पुरी २० वर्षे देखील येत नाहीत; याचे कारण सुलतान युद्धात मेले असे नसून वारसाविषयी काही नियम नसणे व असल्यास तो मोडून राज्य बळकाविण्याच्या दृष्टीने त्या त्या वंशांतल्या लोकांनी केलेल्या हालचाली हे होय. 'राज्यस्नेह: बान्धवस्नेहमतिवर्तते' हेच खरे.

उत्तरेच्या बाजूने थाळनेर (खानदेश) चे फारूकी राज्य, त्यास जोडून गुजरात व माळवा सुलतानांची राज्ये आणि बागळाणांतील बागुलांचे राज्य ही नांदत असल्यामुळे बहमनी व त्यांच्या वारस सुलतानांना उत्तरेकडे आपल्या स्वत:च्या राज्याची वाढ करणे प्राय: अशक्य झाले. शिवाय फारूकी, गुजरात व माळवा सुलतान व नंतरचे मुघल ही राज्ये इस्लामधर्मी होती. त्यामुळे त्याजविषयीं दक्षिणेतील मुसलमानी राज्यांची प्रवृत्ती मऊ होती. पश्चिमेकडे प्रथम सह्याद्री व त्याच्या पश्चिमेस कोकणची दरिद्री अरुंद पट्टी आणि पलीकडे समुद्र असल्यामुळे तिकडेही सत्ता वाढविण्यास फारसा अवकाश नव्हता. राहता राहिल्या दक्षिण व पूर्व या दिशा. या दोन्ही दिशांस बहमनी व त्यांचे वारस सुलतान यांच्या काळास समकालीन असे विजयनगरचे व त्याच्या सत्तेखाली नायक पाळेगारांची राज्ये पसरली होती. ते राज्य धर्माने हिंदूंचे होते. बहमनी व त्यांच्या वारस सुलतानांना उत्तरेकडे राज्य फैलावताना राज्यवर्धनाकांक्षेशिवाय इतर कोणतीही कारणे सांगता येत नव्हती. उलट दक्षिणेस व पूर्वेस राज्यप्रसार करताना तेथे त्यांच्या मताने काफिरांचे राज्य चालू होते. काफिरांचे राज्य बुडविणे हे आपले परम महत्त्वाचे कर्तव्य आहे; त्यासाठी जिहाद पुकारली पाहिजे या सबबीखाली बहमनी व त्यांच्या वारस सुलतानांनी अनेक वेळा जिहादचा पुकारा केला आणि विजय-

नगरकरांशी लढाया केल्या. या लढायांत बहुसंख्य वेळा विजयनगरकरांचा पराभव झाला व अल्पसंख्य प्रसंगी त्यांचा जय झाला असे मुसलमानी इतिहास ग्रंथांवरून म्हणता येते आणि राक्षसतागडीच्या लढाईत विजयनगरकरांचा पूर्ण पराभव झाला, हे पाहिल्यावर वरील विधानांत तथ्य असावे असे वाटते.

बहमनी सल्तनतीचे इ. १४९० ते १५१० चे दरम्यान पाच तुकडे झाल्यावर १५६५ सालचे राक्षसतागडीचे युद्ध हा एकच प्रसंग असा आहे की ज्यावेळी बहमनी राज्याचे हे पाच किंवा अधिक अचुक चार तुकडे एकत्र येवून विजयनगरकरांशी लढले. या युद्धाच्या अगोदर व विशेषत: नंतर आदिलशाही व कुत्बशाही यांना दक्षिणेत आपली राज्ये वाढविण्याची संधी मिळाली. उलट निजामशाही व इमादशाही यांस राज्य वाढविण्यास संधी मिळेना. यामुळे या पाच शाहीतील तंटे, अधिकाधिक गंभीर स्वरूप धारण करू लागले.

उत्तर भारतात मुसलमानी राज्य स्थापन झाल्यापासून ते औरंगजेबाच्या अखेरीपर्यंतच्या काळात हजारो मुसलमान मध्य आशिया, तुर्कस्तान, अरबस्तान, इराण, अफगाणिस्तान, इत्यादी देशांतून उत्तर भारतात आले. त्यांपैकी कितीतरी लोक अत्यंत गरीब अवस्थेत असतानाही केवळ बळकट शरीरयष्टीच्या जोरावर म्हणजे कधी पायी तर कधी गाढव, खेचर किंवा घोडे यांसह व बहीण, मुली, भाऊ, मुलगे यांना घेऊन आणि इस्लामी बंधुभावाचा पाहुणचार घेत खैबर, बोलन इत्यादी खिंडींतून उत्तर भारतात आले. त्यांपैकी बहुतेकांची लग्नाची नाती उत्पन्न केल्यामुळे तेथील मुलकी व लष्करी कामात समावेश झाला. त्यांतील अगदी थोड्याच लोकांना नशीब काढण्यासाठी दक्षिणेत येण्याचा प्रसंग आला.

उलट हबसाण व आफ्रिकेतील इतर देश, यांतील लोकांना हिंदुस्थानात यावयाचे म्हणजे समुद्र ओलांडून यावे लागे. भूमीमार्गे भारतात येणे जितके सोपे तितकेच अवघड समुद्रमार्गे भारतात येणे होते. यामुळे परदेशातून स्थलमार्गे व जलमार्गे आलेल्या या दोन लोकसमूहांच्या



मनोरचनेत फरक पडला. पहिल्या प्रकारचे लोक स्वत:च्या वंशशुद्धीचा व धर्माचरणाचा मोठा अभिमान बाळगीत आणि त्यांचे लक्ष सतत त्यांच्या मूळ वतनी देशाकडे असे. त्यांना भारत हा स्वत:चा देश कधी वाटला असे दिसत नाही. यामुळे दक्षिणेत तरी पहिल्या प्रकारच्या लोकांना परकी हे नाव मिळाले. उलट समुद्र ओलांडून आलेल्या लोकांना जलमार्गाच्या खडतर प्रवासामुळे आपण पुन्हा मायदेशी जावे असे कधीच वाटले नाही. ते दक्षिण हाच आपला देश असे प्राय: समजत. दोघेही मुसलमानी धर्माचे आचरण करणारे होते. तथापि या मनोधारणाभेदामुळे पहिल्या प्रकारचे लोक अहंभावी, दुसऱ्यास तुच्छ लेखणारे व सर्व कर्तबगारीचा मक्ता आपणांसच मिळाला आहे अशा भावनेने दक्षिणेतील बहुजन समाजाशी एवढेच नव्हे तर समुद्रगमन करून दक्षिणेत आलेल्या मुसलमानांशीही तुच्छतेने वागत. उलट समुद्रावरून आलेले लोक दक्षिण हीच आपली मातृभूमी मानून येथेच कायमची वस्ती करावयाची आहे अशा भावनेमुळे दक्षिणेतील बहुजन समाजाशी अधिक सलोख्याने वागत. यामुळे या दुसऱ्या प्रकारच्या लोकांना दक्षिणी हे नाव पडले. या दोन प्रकारच्या लोकांत आणखी एक फरक होता. उत्तरेकडून आलेले लोक गौरवर्ण, उंचेपुरे, अधिक प्रगत संस्कृतीचा आविष्कार करणारे होते; तर दुसऱ्या प्रकारचे लोक काळे, मध्यम उंचीचे व मागासलेल्या संस्कृतीचे होते. यामुळे या दोन प्रकारच्या लोकांमध्ये दोघे इस्लामधर्मी असतानाही विवाहादि किंवा भाषाविषयक देवघेव अतिशय कमी प्रमाणात होई. एवढेच नव्हे तर मुलकी व लष्करी कारभारात एका समूहातले लोक दुसऱ्या समूहातील लोकांना मागे ओढण्याचा किंवा खाली पाडण्याचा प्रयत्न करीत. यामुळे यांमध्ये सुरू असलेली भांडणे पुष्कळ वेळा एवढ्या विकोपाला जात की, त्यांमध्ये चकमकी झडत. चाकणची कत्तल हे त्याचे उत्तम उदाहरण होय. तीमध्ये दक्षिणी लोकांनी परकी लोकांची मोठी कत्तल घडवून आणली. महमूद गावानसारख्या कर्तबगार मुख्य प्रधानाचा सुलतानाकडून खून होणे हे त्याचेच गमक होते. प्रत्यक्ष सुलतान देखील कधी एका पक्षाचा तर कधी दुसऱ्या पक्षाचा पाठपुरावा करी.

महाराष्ट्रात मुसलमानी राज्य स्थापन होण्यापूर्वी मुसलमानांनी दक्षिणेत केलेल्या स्वाऱ्या व त्यांतील अत्याचार यामुळे येथील सामान्य लोक एवढे भयभीत झाले की, त्यांना विरोध करण्याची धमक फारशी कोणी दाखविली नाही. शिवाय मुस्लिम राज्य स्थापन झाल्यानंतर येथील बहुजन समाजाला आरंभी–आरंभी ते व्यर्थच वाटले ते असे: सध्या तात्पुरता अनन्वित जुलूम झाला तरी प्राचीन काळी चालुक्य, राष्ट्रकूट, कलचुरि, यादव, इत्यादी सम्राट घराणी एकामागून एक उदयास आली व अस्त पावली. नवे राज्य स्थापन होत असता काही त्रास आला तरी राज्य स्थिर झाल्यावर त्या घराण्यांनी बहुजन समाजाच्या भाषा, धर्म, संस्कृति, यांच्या प्रगतीत अडथळे तर आणले नाहीतच, उलट ह्या कुळांतील सर्व सम्राट वरील बाबतीत बहुजन समाजाशी एकरूप असल्यामुळे त्या समाजाच्या आशाआकाक्षांना सम्राटांनी पल्लवित केले; असेच हे मुसलमानी राज्यकर्तेही वागतील. पण त्यांचा हा समज लवकरच दूर झाला. नवीन राज्यकर्ते आपल्या इहपारलौकिक आशा–आकांक्षांना प्रोत्साहन तर देणार नाहीतच; पण त्यांना सर्व तऱ्हेने मारण्याचा प्रयत्न मात्र करतील अशी त्यांची खात्री झाली. यांची कारणे दिसून आली ती अशी:–

मुसलमानी राज्यकर्त्यांच्या धर्म, संस्कृति, भाषा, व राज्यपद्धती इत्यादींच्या कल्पना व त्यांना आधारभूत तत्त्वे ही येथील हिंदु तत्त्वांहून अगदी निराळी होती. येथील बहुजन–समाज सामान्यत: ईश्वरवादी असला तरी त्यांच्या ईश्वरविषयक तत्वज्ञानांत पुष्कळ पंथोपपंथ होते, एवढेच नव्हे तर, पाखंडी किंवा नास्तिक लोकही त्या समाजात विशेष त्रास न होता राहू शकत. येथे नव्याने आलेले मुसलमान राज्यकर्ते हेही ईश्वरवादी होते. पण त्यांच्या ईश्वर–व धर्मविषयक कल्पना यांच्या विरुद्ध जे असेल ती सर्व नास्तिकता व तिचा आचार कारणारे ते सर्व काफीर एवढेच नव्हे तर अशा नास्तिकांना सर्व तऱ्हेने चोपून काढून त्यांचा नाश करणे किंवा त्यांना आपल्या धर्मात आणणे हे त्यांस पुण्यकर्म वाटे. ते पुण्य आपणांस मिळावे म्हणून हे राज्यकर्ते बहुजन समाजावर नाना प्रकारचे निर्बंध घालून त्यांना मेटाकुटीस आणण्याचा किंवा अजिबात नष्ट करण्याचा प्रयत्न करीत. ते कर्तव्य करण्यासाठी झटत. त्यांच्या



प्रयत्नांचे स्वरूप असे:– १. जो प्रदेश त्यांच्या ताब्यांत येत गेला त्यातील महत्वाच्या गावांची नावे बदलून त्यांना मुस्लिम नावे देऊ लागणे. २. ते मूर्तिपूजेचे कडवे विरोधक असल्यामुळे जमेल तसे, तेव्हा व त्याप्रकारे मूर्ती फोडीत, व त्या मूर्ती ज्या मंदिरांत बसविलेल्या असत ती मंदिरेही उद्ध्वस्त करीत. मठ, समाधिस्थांने, पाठशाळा यांचीही मूर्तिमंदिरांप्रमाणेंच वासलात लावीत. कधीकधी या मंदिरांना मशीदींचे स्वरूप देत. समाधिस्थानांचे दर्गे बनवीत व पाठशाळांच्या मद्रसा करीत. ३. तलवारीच्या जोरावर काफिरांना एकतर ठार मारीत किंवा बाटवून मुसलमान करीत; ठार मारलेल्या लोकांच्या बायका–मुली आपल्या किंवा आपल्या नातलगांच्या जनानखान्यात घालीत; त्यांच्या मुलांना गुलाम करीत.

इस्लामेतरधर्मीयांशी कोणत्या वेळी कसे वागावे याविषयी कुराणात नेमके काय सांगितले आहे हे अगदी मुळात जाऊन कोणी क्वचितच पाहिले असेल. पण भारतामध्ये जे मुसलमान राज्यकर्ते होऊन गेले त्यांपैकी बहुसंख्य राज्यकर्ते येथे ज्या धोरणाने वागले ते धोरण लक्षात घेत त्यांची मी वर वर्णन केली आहे त्याप्रमाणे दृढ समजूत होती याविषयी शंकाच नाही.*

---

* पूर्वी बघदाद युनिव्हर्सिटीमध्ये व आता माझ्या माहितीप्रमाणे शिकागोस असलेले प्रो. खद्दुरी यांनी लॉ ऑफ वॉर अँड पीस इन इस्लाम नांवाचे एक पुस्तक लिहिले आहे. त्याची पहिली आवृत्ती ते बघदादमध्ये असताना प्रकाशित झाली, तर दुसरी आवृत्ती शिकागोला गेल्यानंतर प्रकाशित झाली. पहिल्या आवृत्तीमधील कित्येक विधाने त्यांनी दुसऱ्या आवृत्तीत सुधारलेली किंवा नेमस्तकेलेली दिसतात. कदाचित शिकागोमध्ये गेल्यानंतर पहिल्या आवृत्तीतील विधाने तेथील लोकांना मानवणार नाहीत असे पाहून त्यांनी तो फरक केला असावा. तेव्हा त्यांच्या विचारांचे वास्तव प्रतिबिंब पहिल्या आवृत्तीतच आहे. असे ते पुस्तक लक्षपूर्वक वाचले तर त्यात मी वर सांगितलेली विधाने असल्याचे प्रत्ययास येईल असे मला वाटते.

राज्यकर्ते प्रजेची सर्व संपत्ती हरण करून तिच्या जिवावर नाना तऱ्हेचे विलास उपभोगीत. हे सर्व करीत असता मिळालेल्या संपत्तीचा १/५ एवढा अंश धर्म केला म्हणजे आपण केलेल्या सर्व पाशवी कृत्यांचा पर्याय झाला असे ते समजत. पण तसा धर्म ते करीत होते किंवा नव्हते याचा पुरावा आपले जवळ नाही. तो करीत असे समजले तरी तो स्वधर्मीयांच्या पुरता मर्यादित राही. काफिरांशी वर्तन करताना आपण दिलेली वचने मोडली, केलेले तह तोडले, तरी ते समर्थनीयच आहे असे त्यास मनःपूर्वक वाटे. या सर्वाला मुसलमान इतिहासकारांनी जिहाद म्हणून संबोधिले आहे. जिहादचा धात्वर्थ प्रयत्न हा असून लौकिक अर्थ धर्मप्रसारासाठी केलेले युद्ध असा आहे. जिहादचा या विसाव्या शतकात जसा मधून मधून पुकारा होतो, तसा मुसलमानी कालात मुस्लिम इतिहासकारांनी आपल्या ग्रंथांतून शेकडो वेळा निर्देश केला आहे त्यात काही अतिशयोक्तीचा भाग आहे असे मानले तरी काही भाग शिल्लक राहतोच हे विसरता कामा नये.

मुहम्मदी धर्म स्थापन झाल्यानंतर एक–दोन शतकांतच त्या धर्मातील तत्त्वज्ञान व आचार यांच्या सत्यतेविषयी कित्येक विचारी मुसलमानांच्या मनात शंका येऊ लागल्या. या शंकेखोरांचा तात्त्विक विचारांवर व त्यांतून प्रसवणाऱ्या आचारांवर भर होता. अशा लोकांचा एक पंथ तयार झाला. ते आपणांस सूफी म्हणवू लागले. मुस्लिमधर्मी प्रदेशात या लोकांना सामान्य मुस्लिम जनतेपासून कधी कधी त्रास सोसावा लागला तरी तो सहज सहन करता येईल इतपतच प्रखर होता. या पंथाचे म्हणून म्हणविणारे जे लोक भारतामध्ये उत्तरेत व दक्षिणेत आले ते सर्वसामान्य मुस्लिमांएवढेच धर्मांध होते. तरीही त्यांच्या भोवती साधुत्वाचे वलय असल्यामुळे त्यांनी चालविलेला धर्मप्रसार विशेष परिणामकारक होई. हे सूफीपंथी साधू उत्तरेत व दक्षिणेत मुसलमानी राज्ये अस्तित्वात येण्यापूर्वीही वस्ती करून राहिले होते. त्यांच्या भोवती चमत्काराचे आणखी एक नेत्रदीपक वलय असल्यामुळे सर्वसामान्य अज्ञ जनता त्यांच्या चमत्कारांनी दिपून जाई. या सूफीपंथात चिश्ती, नक्शबंदी, सुहरावर्दी आणि कादिरी असे चार मुख्य उपपंथ उत्पन्न झाले. उपपंथ



कोणता का असेना सूफी साधू धर्मप्रसाराच्या बाबतीत सारखेच कडवे होते. शिवाय या साधूंना सामान्यतः राजाश्रय मिळे. एवढेच नव्हे तर काही सुलतानांनी आपल्या बहिणी व मुली यांची अशा साधूंशी लग्नेही लावून दिली. कित्येक सुलतानांनी अशा साधूंना मुद्दाम बोलावून आणून व त्यांना मोठमोठी इनामे देऊन त्यांजकडून धर्मप्रसाराची प्रत्यक्षाप्रत्यक्ष व्यवस्थाही केली होती. यामुळे या साधूंचे धर्मप्रसाराचे काम अव्याहत चालत राहिले. शिवाय परदेशांतील इस्लामी साधू, संतमहंत, विद्वान याजकडे येथून नित्यनैमित्तिक देणग्या जात त्या निराळ्याच.

राज्ये व साम्राज्ये यांच्या उदयास्तांमध्ये सामान्यतः एक नियम असा आढळतो की, जलद दळणवळणाच्या साधनांच्या अभावी कोणतेही विस्तृत राज्य किंवा साम्राज्य फार वर्षे एकत्रित सुबद्ध राहू शकत नाही. त्याच्या विस्ताराच्या भारानेच त्याचे तुकडे पडतात. म्हणजे प्रथम त्या राज्यातील अत्यंत दूरच्या प्रदेशांत नेमलेले अधिकारी हळूहळू स्वतंत्र होऊ लागून राज्याचे तुकडे होतात आणि शेवटी गाभाही फुटून नाश पावतो. अगदी प्राचीन म्हणजे अशोकाच्या कालापासून पेशवाईच्या अखेरीपर्यंत भारतात तरी हेच दिसून आले आहे या नियमाला उत्तम दृष्टांत द्यावयाचा म्हणजे कुंभाराचे चाक व त्यावर घातलेला चिखल. कुंभार चाक फिरवू लागला म्हणजे प्रथम बाजूबाजूचे तुकडे उडतात आणि नंतर गाभाही उध्वस्त होतो. अधिक असलेला बाहेरचा चिखल आपोआप गळून पडतो. त्याचप्रमाणे सतत फिरणाऱ्या कालचक्रामुळे अवजड झालेल्या साम्राज्याचे तुकडे उडतात.

भारतातील राज्यकर्त्यांबाबत आणखी एक वस्तुस्थिती ठळकपणे दिसून आली आहे, ती ही की कोणत्याही राजवंशातील झाडून सारे राजे सारख्या कर्तबगारीचे तर निघाले नाहीतच; उलट, ही कर्तबगारी पहिल्या काही पिढ्यांत शिगेला पोहोचते आणि विस्तृत राज्य किंवा साम्राज्य तयार होते. पण नंतरच्या पिढ्यांत कर्तबगारीचा हळूहळू ऱ्हास होत जातो. असा ऱ्हास होऊ लागला म्हणजे प्रथम दूरदूरचे अधिकारी स्वतंत्र होतात. कारण ऱ्हास पावणाऱ्या कर्तबगारीचे राजे अशा दूरच्या अधिकाऱ्यांवर आपला आवश्यक तेवढा दाब ठेवू शकत नाहीत.

याशिवाय, राज्ये व साम्राज्ये कोलमडण्याचे आणखीही एक कारण आहे. एकदा राज्य किंवा साम्राज्य सुस्थिर झाले म्हणजे राजवंशांतील राज्याधिकारी होणाऱ्या व्यक्ती अधिकाधिक विलासी, पराक्रमशून्य, क्रूर, संशयी इत्यादी वाढत्या दुर्गुणांनी युक्त होऊ लागतात. असे झाले म्हणजे त्यांचे राज्य सांभाळण्यावरचे लक्ष उडते. त्याचा परिणाम दरबारात पक्षोपपक्ष तयार होण्यात होतो. त्यांची भांडणे मिटविणे राजाच्या शक्ती-बाहेर जाते. अशा भांडणात राजांचेही खून पडतात आणि पक्षीय राजकारणाचे प्राबल्य वाढते. त्यातून राजा पोरसवदा असेल तर विचारा-वयासच नको. सबंध राज्यात किंवा साम्राज्यात गोंधळाची परिस्थिती उत्पन्न होऊन राज्य मोडकळीस येते.

राज्य टिकणे किंवा मोडणे यास भोवतालची राज्येही कारणीभूत होतात. कोणाही राजास सामान्यतः राज्यवाढीचा हव्यास असतो. पण त्यास आवश्यक ती कर्तबगारी, पराक्रम, नेतृत्व इत्यादी गुण प्रत्येक राजापाशी असतातच असे नाही. हे गुण जसे असतील त्या मानाने भोवतालचे राजे उण्याअधिक प्रमाणात शेजारच्या राज्यावर आक्रमण करण्याचा प्रयत्न करतात. या प्रयत्नाचा जे यशस्वी प्रतिकार करतात त्यांची राज्ये विस्तार पावतात किंवा टिकून तरी राहतात. इतरांच्या राज्यांचा हळूहळू संकोच होत जाऊन शेवटी ती अस्तंगत होतात

मागे दिलेल्या वंशांचे आणि त्यांतल्या त्यात बहमनी वंशाचा इतिहास वर सांगितलेल्या तात्त्विक विवेचनाचे उत्तम उदाहरण होय. या वंशात झालेल्या अठरा सुलतानांपैकी जेमतेम आठ सुलतानांच्या कार-किर्दीत त्यांच्या कर्तबगारीमुळे राज्यविस्तार होत राहिला. पण पुढील सुलतान विशेष कर्तबगार न निघाल्यामुळे राज्यात अव्यवस्था उत्पन्न झाली आणि पुढे सुमारे पन्नास पाऊणशे वर्षांत त्या राज्याचा ऱ्हास होत गेला. याचा फायदा घेऊन विजापूर, अहमदनगर, गोवळकोंडे आणि अचलपूर (एलिचपूर) येथील चार अधिकाऱ्यांनी अनुक्रमे आदिलशाही, निजामशाही, कुत्बशाही व इमादशाही या नांवांची आपआपली स्वतंत्र राज्ये स्थापन केली. एवढेच नव्हे तर खुद्द बीदर या राजधानीतही बह-



मनी सुलतानांना प्रायः बाजूस सारून तेथे बरीदशाहीची स्थापन झाली. जोवर बहमनी सल्तनत विकसनशील होती तोवर तिला खानदेश, गुजरात, गजपती, विजयनगर सम्राट, इत्यादी दूरवरच्या सत्तांशी झगडे करावे लागले. पण या बहमनी राज्याचे वर सांगितल्याप्रमाणे पाच तुकडे झाल्यावर खरे बहमनी राज्य प्रायः संपुष्टांत आले. हे तुकडे झाल्यावर चार नाभधारी बहमनी सुल्तान होऊन गेले पण त्यांची सत्ता या पाच शाह्यांवर न चालता यांच्या ओंजळीनेच त्यांना पाणी पिण्याचा प्रसंग आला. शेवटी इ. १५२८ च्या सुमारास बहमनी रियासतीचा संपूर्ण अस्त झाला. यावेळी बहमनी राज्याचे मूळ शत्रू फारूकी व गुजरात सुलतान, विजयनगर हे अस्तित्वात होतेच. पण ह्या पांच शाह्या स्वतंत्र झाल्यावर त्यांचे हितसंबंधही अलग अलग झाले. आणि त्या हितसंबंधाच्या रक्षणा-साठी ह्या पांच शाह्या आपसांत झगडू लागल्या. तेव्हा त्यांचे दूरच्या शत्रूवरील लक्ष उडून गेले. त्यातल्या त्यात गुजरात व फारूकी सुलतान यांजकडे लक्ष देण्यास कोणासच फारशी फुरसत मिळाली नाही. या पाच शाह्यांपैकी इमादशाही सर्वांत प्रथम बुडाली किंवा अकबराने बुडविली. नंतर फारूकी सल्तनत त्यानेच प्रायः बुडविली पुढे बरीदशाही संपली. बाकीच्या तीन शाह्या क्रमाने मुघलांनी बुडविल्या. या पाच शाह्यांपैकी आदिलशाही व कुत्बशाही राज्यांची सीमा विजयनगर साम्राज्याच्या सीमेशी भिडल्यामुळे या दोन शाह्यांचे कधी विजयनगरकरांशी तंटे होत तर कधी या विजयनगरकरांची मदत घेऊन ते आपसात झगडत.

असे काही दिवस चालल्यानंतर एकदा विजयनगरच्या रामराजाने आदिलशाही व निजामशाही यांच्या भांडणात आदिलशाहीला साह्य करण्याच्या निमित्ताने अहमदनगरपर्यंत मजल मारली व निजामशाहीचा बराचसा भाग उध्वस्त केला. यामुळे निजामशाहीचे सर्वाधिक नुकसान झाले. विजयनगरच्या सम्राटांकडून आदिलशाही व कुत्बशाही यांनाही त्रास होत होता. तेव्हा विजयनगरच्या सम्राटांची एकदा चांगली पुनः डोके वर न काढतील अशी खोड मोडावी या हेतूने विशेषतः अहमदनगरचा सुलतान हुसैन निजामशाह याच्या पुढाकाराने चारही शाह्यांनी एकजूट

केली. एलिचपूरचा इमादशाह आणि अकबर यांसही त्यांनी आपल्या साह्यास बोलाविले. पण ते आले नाहीत, व त्यांना येणेही शक्य नव्हते. विजापूरचा त्या वेळचा सुलतान अली आदिलशाह हा स्वतःस रामराजाचा मुलगा म्हणवी. आणि रामराजाही तसे मानी, अशी जनश्रुती आहे. पण त्या वेळी या चारही सुलतानांनी रामराजावर चढाई करून १५६५ च्या जानेवारीत राक्षसतागडी येथे झालेल्या घनघोर लढाईत त्याचा सपशेल पराभव केला व त्यास ठार मारले. यामुळे विजयनगरचा जणू विध्वंसच झाला असे वाटले. तसे पाहिले तर या लढाईमुळे विजयनगर साम्राज्याचा विध्वंस झाला हे खरेच; पण तो सर्वस्वी झाला नव्हता. त्या वेळचा विजयनगर सम्राट सदाशिवराय हा पुढे काही वर्षे जिवंत होता. त्याने व त्याच्या पुढील राज्यकर्त्यांनी आपली राजधानी प्रथम पेनुगोंडे येथे व नंतर चंद्रगिरि येथे नेऊन आपले मोडकळीस आलेले साम्राज्य मांडलिक नायक व पाळेगार यांच्या साहाय्याने टिकविण्याचा प्रयत्न केला. त्याप्रमाणे ते पुढे शेसवाशे वर्षे टिकलेही. पण त्यात पूर्वीचा जोम शिल्लक राहिला नव्हता. या राक्षसतागडीच्या लढाईत चारही सुलतानांस काही कमी किंमत द्यावी लागली नाही त्यांचा विजय झाला खरा; पण लढाईत झालेली जबर हानी आणि आपसांतील स्पर्धा यामुळे या विजयाचा ते तात्काळ फायदा घेऊ शकले नाहीत. उलट, विजयनगर साम्राज्य मोडकळीस आले तरी त्याच्या हाताखालचे निरनिराळे नायक व पाळेगार किंवा संस्थानिक हे प्रायः सुरक्षित राहिले आणि त्यांनी बहुजन समाजाचा धर्म, संस्कृति, भाषा इ. चे रक्षण करण्याचा प्रयत्न केला. यात इक्केरी, चित्रदुर्ग, बसवापट्टण, बंगलूर, तिरुचिरापल्ली, तंजावुर, मदुरा इ. ठिकाणचे नायक प्रमुख होते.

इकडे महाराष्ट्रात व त्याच्या आसपास राज्य करणाऱ्या चार सुलतानांचे आपसांतील फार वर्षांपासून चाललेले वैर पुन्हा उफाळून आले. ह्या वैराच्या धकाधकीत लागणारे सैन्य कसे व कोठून उभे करावयाचे हा या सुलतानांपुढे प्रश्न होता. मी मागे सांगितलेच आहे की, पश्चिम व मध्य आशियातून खुश्कीच्या मार्गाने येणारा मुसलमान समाज, त्यास



उत्तरेतच काम मिळाल्यामुळे, दक्षिणेपर्यंत सामान्यतः पोचू शकत नसे. आणि समुद्रमार्गाने दक्षिणेत येणाऱ्या मुसलमानांची संख्या थोडी होती. यामुळे येथील सुलतानांना स्वतःच्या राज्याचा म्हणजे स्वतःचा स्वार्थ साधण्यासाठी येथील बहुजन समाजाचा उपयोग करून घेणे आवश्यक ठरले. बहमनी अमदानीत येथील बहुजनसमाजापैकी कोणत्या जमातीचे किती लोक राज्यकारभार व सैनिकी कार्य यांत गुंतले होते हे समजण्यास आज मार्ग नाही. फिरिश्ता किंवा तबातबा यांचे इतिहास तपासले तर त्यांत शेकडा ४ इतकीही बहुजन समाजातील नावे आढळत नाहीत आणि जी आढळतात त्यांपैकी निम्मी तरी बहमनी राज्यास विरोध करणारांची आहेत. यावरून असे वाटते की, एकशे नव्वद वर्षांच्या बहमनी कालात येथील बहुजन समाजातील लोकांना राज्यकारभार व सैनिकी पेशा यांत उच्च पदे मिळत नव्हती.

राक्षसतागडीच्या युद्धानंतर सुरू झालेल्या सुलतानांच्या राज्य विकासाच्या स्पर्धेत हळूहळु वरच्या दर्जाची स्थाने येथील बहुजन समाजातील कर्तबगार लोकांना मिळू लागली. त्यांत कोणकोणत्या जमाती पुढे आल्या हे पाहिले तर ब्राह्मण, मराठे व धनगर या तीन जमातींची नावे चटकन डोळ्यांपुढे येतात. यांपैकी धनगर जमातीकडे वतनी कामे होती की नाही हे समजत नाही. बहुधा नसावीत असे वाटते. त्या जमातींपैकी जे पुढे आले ते सर्व मुकासेदार किंवा जागीरदार असलेले दिसतात. पण ब्राह्मण व मराठे यांमध्ये पाटिलकी व देशमुखी या वतनांची पुष्कळ सरमिसळ झालेली आढळते. पूर्वी वतने विकता येत. यामुळे जाति व वतने यांची अधिकच सरमिसळ झाली. बहुतेक ठिकाणी पाटील ब्राह्मण नाहीत. पण पंढरपूर, पैठण इ. ठिकाणी पाटील ब्राह्मण आहेत. त्या मानाने कुलकर्णी व देशपांडे यात सरमिसळ कमी झालेली दिसते. अब्राह्मण कुलकर्णी किंवा देशपांडे घराणे एखादेच असेल. हुबळीजवळच्या कुंदगोळ गावचे देशपांडे लिंगायत आहेत हे मला पक्के ठाऊक आहे. हल्याळसारख्या काही ठिकाणी जैन, तर मुरगोड, वंटमुरी, लक्ष्मेश्वर यांसारख्या काही ठिकाणी लिंगायत देशमुख आहेत. तीच गोष्ट शेटे–महाजनांची आहे. गावाला जसे पाटील कुलकर्णी, तसे पेठेला शेटे महाजन. शेटे बव्हंशी मराठे

असत आणि महाजन ब्राह्मण असत. पण काही ठिकाणी ब्राह्मण शेटे आहेत. तर महाजन जैन आहेत. राक्षणतागडीच्या लढाईनंतर या वतनदारांना प्रथम महत्त्व आले. त्यातल्या त्यात देशमुख पुढे सरसावले; एवढे की, नळदुर्गच्या एकाच देशमुखाच्या घराण्यात देशमुखी, पाटीलकी, कुलकर्णकी, शेटेपण, महाजनकी, चौधरकी, नाडगौडकी इ. अनेक सरकारी सेवा व त्यासाठी मिळणारी वतने एकत्रित झालेली दिसतात. हे सर्व अधिकार उपभोगणारे वतनदार बहुतेक ठिकाणी ब्राह्मण जमातीतील आहेत. नळदुर्ग, कलबर्गे, नारायणपूर, चिंचोली, रायचूर, धारवाड, गदग, गुत्तल, हुबळी, कुंदगोळ इ. त्यांची उदाहरणे आहेत. वर सांगितलेल्या अनेक सेवा व अधिकार यांचे केंद्रीकरण झाले म्हणजे ते अधिकार चालविण्यासाठी व ज्यांनी हे अधिकार बहाल केले त्या सुलतानांना साह्य करण्यासाठी या देसायांना आपल्या पदरी सैन्य बाळगावे लागे. त्या सैन्याचा खर्च भागविण्यासाठी वतनाशिवाय आणखीही काही प्रदेशांचा मुकासा (तात्पुरती जागीर) किंवा जागीर मिळे आणि तिचे रूपांतर पुढे आनुवंशिक मिळकतीमध्ये होई.

हळूहळू हे देसाई सरदार बनत गेले. आपण निजामशाही, आदिलशाही व कुत्बशाही यांच्या राक्षसतागडीच्या लढाईनंतरच्या इतिहासाचे अवलोकन केले तर ब्राह्मण व मराठे या दोन जमातींपैकी कितीतरी घराणी देशमुखी वगैरे वतने सांभाळून पुन्हा सरदार बनलेली दिसतात. वर उल्लेखिलेल्या प्रत्येक ठिकाणचे देसाई किंवा देशमूख असेच सरदार बनले. आपल्या इकडे जुन्नरचे हांडे, पुण्याचे शितोळे, शिवापूरचे कोंडे, कानदखोऱ्याचे मरळ, वेळवंडखोऱ्याचे शिलीमकर, कारीचे जेधे, हिरडसमावळचे बांदल, अंबाडचाचे खोपडे, वाईचे पिसाळ, जावळीचे मोरे, बुधपाचेगावचे घाटगे, फलटणचे निंबाळकर, म्हसवडचे माने, कऱ्हाड ते कोल्हापूर पर्यंतचे जाधव, घोरपडे, जगदाळे, फडतरे, भीमातीरचे भोसले, माहूरचे उदाराम देशमूख, सिंदखेडचे जाधव, कापशीकागलचे घोरपडे, घाटगे, इत्यादी देशमूख असेच लहान मोठे सरदार बनले. यांतच खराडे, पांढरे, ढोणे इ. धनगर सरदारही समाविष्ट करावे लागतील. त्यांचा वारसा पुढे होळकर, वाबळे, फणसे, लांबहाते, बारगळ यांनी चालविला.



हे लोक सुलतानापुढे सामान्यतः नमून असत. आपल्या धर्माचे प्रायः प्रदर्शन करीत नसत. मुसलमानी सरदारांबरोबर स्वारीवर गेले असता मुसलमान सरदारांनी हिंदू धर्माची, त्यांच्या प्रतीकांची केलेली अवहेलना दुर्लक्षित किंवा सहन करीत. यामुळे वर सांगितलेल्या जमातींतले लोक हळूहळू उच्च पदावर चढत गेले.

मुसलमान सरदारही नुकत्याच नव्याने जिंकलेल्या प्रदेशात बहुजन समाजाची मने दुखविणारे अत्याचार करीत असले तरी वतनदार व जागीरदार यांची मने दुखविणारी कृत्ये जाणूनबुजून सहसा करीत नसत. यामुळे या सरदारांच्या किंवा वतनदार देशमुखांच्या प्रत्यक्ष अधिकाराखाली असलेल्या प्रदेशांत फारसे धार्मिक किंवा सामाजिक अत्याचार होत नसावे. त्यावेळचा बहुजन समाज, बलिष्ठ सरदार व राज्य कारभारातील मुत्सद्दी हे कसे वागत याचे मोठे मार्मिक वर्णन वेंकटाध्वरी या कवीने आपल्या विश्वगुणादर्शचंपूतील महाराष्ट्र–वर्णनात केले आहे. तो म्हणतो की, राजकारणात गुंतलेले मुत्सद्दी व सरदार हे अंशतः मुस्लिम संस्कृतिमय झाले असले, तसेच त्याबद्दल त्यांना विशेष खंत वाटत नसली तरी त्यांच्या प्रदेशांत ते शेर असल्यामुळे त्या प्रदेशांतील लोकांचे धार्मिक व सामाजिक आचार सामान्यतः यथापूर्व चालत. त्यांत फारसे व्यत्यय येत नसत. एखादा व्यत्यय आलाच तर बहुजन समाज तो ' काय करावे मुसलमानी राज्य आहे, उपाय नाही ' अशा समजुतीने सहन करी.

सारांश येथील बहुजन समाजाच्या हाती जी वाढती सत्ता येत गेली तीमध्ये पुढील स्वराज्याचे बीज आहे.

---

# ३. धार्मिक व सामाजिक परिस्थिती

महाराष्ट्रावर मुसलमानी सत्ता स्थापन झाल्यावर ती धर्माने, संस्कृतीने, भाषेने, तत्त्वज्ञानाने व इतर अनेक प्रकारे भिन्न असल्यामुळे त्या सत्तेचा येथील समाजावर विविध प्रकारचा परिणाम होणे अपरिहार्य होते. ते परिणाम कोणते हे पाहणे अतिशय उद्‌बोधक होईल. मात्र ते पाहण्यासाठी उपयुक्त ठरणारी साधने अतिशय अल्प असल्यामुळे सूक्ष्म व विस्तृत निरीक्षण आणि त्यावरून काढलेली अनुमाने यावर अवलंबून राहिले पाहिजे. सूक्ष्म व विस्तृत निरीक्षणासाठी अख्ख्या महाराष्ट्रामध्ये गावोगावी हिंडून मूक व बोलके अवशेष तपासून ते दाखवीत व सांगीत असलेल्या माहितीची झडती घेऊन व कडसणी करून आपली अनुमाने तयार केली पाहिजेत. आपण जे येथे जमले आहा त्या सर्वांपेक्षा मी महाराष्ट्रातील खेडी व शहरे यांत अधिक भ्रमण केले असल्यामुळे माझे निरीक्षण अधिक व्यापक आहे एवढे सांगण्यास हरकत नाही.

मुसलमान सत्ताधारी धर्माने इस्लामी होते तर शासित प्रजा धर्माने हिंदू होती. 'सर्व धर्मांची मूलतत्त्वे एकच आहेत' हे विधान सांगण्यास व ऐकण्यास फार गोड असले व त्याचा सद्य:स्थितीत उपयोग होत असला तरी ते अतिशय भोंगळ व सत्याचा अपलाप करणारे आहे. एका पद्यात म्हटल्याप्रमाणे 'धरम धरम में भेद रहत है' हे विधान अधिक सत्याधिष्ठित आहे. धर्मामध्ये मुख्य भाग ईश्वर व त्याचे स्वरूप, चराचरांचे स्वरूप, ईश्वर व चराचर यांचे संबंध, आणि मानवाचे सर्वश्रेष्ठ ध्येय याबाबत सर्व धर्मांचे एक मत नाही. इस्लामी व ख्रिस्ती धर्मांत एकेश्वरी मताचा मोठा प्रभाव आहे. शासितांच्या हिंदू धर्मात एकेश्वरी मतापासून ते अनीश्वर वादापर्यंत सर्व मतांचा आविष्कार झालेला आहे. हे जसे खरे





तसे ईश्वराची शक्ती व तिचा उपयोग कसा होतो याविषयीही पुष्कळच मतभेद आहेत. मानव मेल्यानंतर काय होते याविषयी तर एवढा मोठा फरक आहे की, त्यांची तुलना करणेच अशक्य आहे. यामुळे मानवाच्या ऐहिक व पारलौकिक ध्येयांमध्येही विलक्षण फरक पडलेला आहे.

मुसलमानपूर्व कालात महाराष्ट्रात अद्वैत, द्वैत, विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत, पुष्टी इत्यादी पंथांचा कितपत प्रभाव होता हे स्पष्ट व तपशीलवार समजत नसले तरी महाराष्ट्रातील मुसलमानपूर्वकालीन बहुतेक लोक अद्वैतवादी किंवा एकेश्वरी मताचे पुरस्कर्ते असावेत असे वाटते. इस्लामी व त्यानंतरच्या मराठी कालात होऊन गेलेल्या झाडून साऱ्या मराठी साधु–संतमहंतांनी एकेश्वरी मताचा पुरस्कार केलेला दिसतो. एवढेच नव्हे तर कालक्रमाने अस्तित्वात आलेल्या शेकडो देवदेवता एकच परमेश्वर दाखवितात अशी येथील बहुजन समाजाची पक्की भावना होती. यामुळे येथील समाजात शैव, वैष्णव, गाणपत्य, शाक्त इत्यादी पंथभेद असले तरी ते अत्यंत नेमस्त प्रमाणात चालू होते. म्हणजे येथील बहुजन समाज सर्वच देवतांची एक परमेश्वर म्हणून पूजा व उपासना करणारा होता. अर्थात तो जसा एकादशीचा, तसाच शिवरात्रीचा उपास करी, आणि देवीचे आणि खंडोबाचे नवरात्र किंवा षड्रात्रही पाळी. आपण अनेक ईश्वर मानतो असे त्याच्या कधीही मनात येत नसे.

या दृष्टीने शास्ते व शासित हे एकमेकांपासून फार दूर होते असे नाही. तथापि, शास्त्यांमध्ये प्रतीकोपासना प्राय: नव्हती. तरीही प्रार्थना करतांना भारतातील इस्लामी सत्ताधारी त्यांचे सर्वांत पवित्र क्षेत्र जे मक्का ते भारताच्या पश्चिमेस असल्यामुळे पश्चिमेकडे तोंड करून प्रार्थना करीत आणि मशीद किंवा ईदगाह यांची बांधणी सामान्यत: दक्षिणोत्तर असून त्यांच्या मध्यात पश्चिमेच्या बाजूस कमान काढीत व या ठिकाणीही पश्चिमेकडे तोंड करून प्रार्थना करीत. एका तऱ्हेने ही प्रतीकोपासनाच आहे. पण शास्त्यांची ही प्रतीकोपासना व शासितांची प्रतीकोपासना यांमध्ये महदंतर होते. शासित एकाच परमेश्वराची अनेक मानव, प्राणी अथवा अमानव रूपे कल्पून त्यांची परमेश्वर म्हणून उपासना करीत.

शास्त्यांना त्यांच्या सामान्यतः कडव्या धर्मवेडामुळें शासितांची अशी प्रतीकोंना मुळीच पसंत नसे. एवढेच नव्हे तर, अशा प्रतीकांचा नाश करणे हे इस्लामी व ख्रिस्ती शास्त्यांना आपले परमश्रेष्ठ कर्तव्य वाटे.

म्हणून, इस्लामी व ख्रिस्ती शास्त्यांनी शासितांची ही प्रतीके म्हणजे मूर्ती आणि ही प्रतीके ज्या स्थानी प्रतिष्ठित असत ती मंदिरे तोडण्याचा सर्वशक्ती खर्चून प्रयत्न केलेला दिसतो. या दोन शास्त्यांपैकी ख्रिस्ती शास्ते अधिक सुधारलेले, अधिक पद्धतशीर लेखनकार्य करणारे, तसेच झालेले कार्य लिहून ठेवणारे असल्यामुळे त्यांनी या बाबतीत काय केले याचा लिखित पुरावा मिळू शकतो. इ. १४९८ मध्ये ख्रिस्ती पोर्तुगीजांचे महाराष्ट्रास प्रथम पाय लागले. इ. १५१० मध्ये त्यांनी गोवे जिंकले. आणि इ. १५४० पर्यंत बारदेश, तिसवाडी व साष्टी यांचा एकत्रित, साधारणतः तीन तालुक्याएवढा होणारा, प्रदेश काबीज करताच त्यांनी शासितांची मंदिर, मूर्ती इ. प्रतीके नाहीशी करण्यासाठी व शासितांना सक्तीने बाटवून आपल्या धर्मात ओढण्यासाठी कोणते प्रयत्न केले याचा इ. १५४० च्या सुमारास लिहिलेला एक वृत्तान्त 'बोलेतिम् दो इन्स्तित्यूतो द व्हास्को द गाम' या गोव्याहून प्रसिद्ध होत असलेल्या नियतकालिकाच्या ६८ व्या अंकात प्रकाशित झाला आहे. यामध्ये पोर्तुगीज शास्त्यांनी वरील तीन तालुक्यांत मूर्ती फोडणे, देवळे तोडणे व माणसे बाटविणे या बाबतीत जे केले त्याच्या नावनिशीवार सूची प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांवरून पोर्तुगीज ख्रिश्चनांनी आपली सत्ता स्थापन होताच त्या सत्तेखालच्या शासितांमध्ये स्वधर्माचा प्रसार करण्यासाठी काय केले याची चांगली कल्पना येते. याशिवाय गोव्यामध्ये इन्क्विझिशनचा उपक्रम केल्यानंतर शासितांची काय अवस्था झाली हे कै. प्रियोळकर यांच्या 'गोवा इन्क्विझिशन' या पुस्तकावरून कल्पना येऊ शकते. तेथील शास्त्यांच्या, कधी कधी अशा तऱ्हेने धार्मिक जुलूम करणे योग्य नव्हे, त्याचा परिणाम राजकीय स्थैर्यावरही होतो हे लक्षात येई आणि म्हणून ते आपल्या वरिष्ठांना याबद्दलची आपली नापसंती कळवीत व कधी कधी आपल्या अधिकारात अशा प्रकारचे क्रूर व वेडे आचार मना करीत. पण त्यांचे असे करणे फार वेळ टिकत नसे.



ऐहिक सुधारणांमध्ये ख्रिस्ती शास्त्यांच्या मानाने इस्लामी शास्ते मागासलेले होते. यामुळे ख्रिस्ती शास्त्यांप्रमाणे इस्लामी शास्त्यांनी आपण आपल्या धर्माचा व मतांचा प्रसार करण्यासाठी कोणकोणते प्रयत्न केले याविषयी संगतवार व तपशीलवार लिहून ठेवलेले आढळत नाही. मुसलमानी इतिहास ग्रंथांत, शास्त्यांनी अनेक वेळा जिहाद म्हणजे धर्मयुद्धे केली; त्यांत बहुतेक वेळा त्यांना विजय मिळाले आणि ते विजय मिळाल्यावर त्यांनी शासितांच्या अनेक मूर्ती फोडल्या, देवळे तोडली; समाधी उद्ध्वस्त करून टाकल्या, पाठशाळा जमीनदोस्त केल्या, शत्रूची लुटालूट केली; त्यांच्या मुलांना गुलाम केले; त्यांच्या बायकांना आपल्या जनानखान्यात घातले; इत्यादी वर्णने येतात. यांत जसा काही अतिशयोक्तीचा भाग असावा असे वाटते, तसाच नावनिशिवार तपशील नसल्यामुळे त्यातून सर्व सामान्य समजुतीपेक्षा अधिक काही हाती लागत नाही.

तथापि, काही मशिदींतून असे काही लेख आहेत की ज्यांवरून भारतातील इस्लामी राज्यकर्त्यांची ध्येय धोरणे कशी होती हे समजून येते. उदाहरणार्थ, दिल्लीमध्ये कुत्बमिनारच्या जवळ कुव्वतुल इस्लाम नावाची जी एक इस्लामी सत्तेच्या आरंभीच्या काळातील मशीद आहे तिच्या बांधणीत हिंदू देवळातील खांब वगैरे सामग्रीचा पुष्कळच उपयोग केलेला आहे. आणि शिवाय त्या मशिदीमधील शिलालेखातही ती मशीद बांधण्यासाठी ज्यांचे मूल्य सत्तावीस लाख देहलीवाल (एक सोन्याचे नाणे) होईल अशा उद्ध्वस्त केलेल्या देवळांची सामग्री वापरली आहे. काशीमध्ये कृत्तिवासेश्वर या नावाचे एक जुने देवालय होते. ते मोडून त्या ठिकाणी सध्या लहानशी मशीद उभारली आहे. त्या मशिदीत पूर्वी एक शिलालेख होता. आता तो तेथे नाही. तथापि, त्या शिलालेखात वरील देवालय मोडून तेथे मशीद बांधल्याचा लेख असल्याचे हिंदीचे प्रसिद्ध पूर्वसूरी श्रीहरिश्चंद्र यांनी आपल्या एका लेखात सांगितले आहे. काशीतच विश्वेश्वर व बिंदुमाधव यांच्या मंदिरांचे मशिदींत रूपांतर केले हे सर्वत्र ज्ञात आहे.

भारताच्या इतिहासात अशी शेकडो उदाहरणे आहेत. पण ही उदाहरणे महाराष्ट्राच्या बाहेरची आहेत. महाराष्ट्रात पुणे जिल्ह्यातील घोडे या गावातील मशिदीत एक फार्सी शिलालेख आहे. त्यांत खोदविणारा म्हणतो की, देवाच्या प्रसादासाठी मी तीस आणि तीन देवळे तोडली आणि मग या खराबाबादेत मशिदीचा पाया घातला. या गावाचे जुने नाव घोडे. त्या गावी असणारी जी नदी ती घोडनदी. पण लेख खोदविणारास घोडनदी हे नाव न आवडून त्याने तीस खराब असे नाव दिले. खर या शब्दाचा फार्सीतील अर्थ गाढव आणि खराब म्हणजे गाढवाचे मूत. तेव्हा हा लेख खोदविणाराचे मताने घोडनदी ऐवजी त्या नदीस गाढवाच्या मुताची नदी म्हणणे उचित आहे असे वाटून तेथे असलेल्या गावास त्याने खराबाबाद असे नाव दिले. प्रस्तुत लेख प्रथम मी प्रसिद्ध केला असून नंतर तो लेख इन्स्क्रिप्शन्स फ्रॉम दि बॉम्बे प्रेसिडेन्सी या भारत सरकारने प्रसिद्ध केलेल्या प्रकाशनात प्रसिद्ध झाला आहे. त्यांनी माझ्या लेखावरून सदरहू लेख घेतला असे नाही. त्यांनी तो स्वतंत्रतेने मिळवून प्रकाशित केला आहे.

हा एकाच मनुष्याने तेहतीस देवळे तोडल्याचा लिखित पुरावा झाला. पण अलिखित पुरावे शेकडो आहेत. मुसलमानी कालात सामान्यत: प्रत्येक परगण्याच्या (तालुक्याच्या) तसेच सरकारच्या, (जिल्ह्याच्या) गावीच्या तसेच प्रत्येक हिंदू तीर्थक्षेत्रात तोडलेल्या देवळांचे अवशेष किंवा देवळे तोडून बनविलेल्या मशीदी किती तरी आहेत. या सर्वांचे परिगणन येथे करणे शक्यच नाही. पण उदाहरणादाखल पाचपंचवीस नावे येथे देतो— पंढरपूर, कोल्हापूर, सोलापूर, परिंडे, मंगळवेढे, वाई, कऱ्हाड, मिरज, आंबेजोगाई, परळी-वैजनाथ, नळदुर्ग, तुळजापूर, चाफळ, बीड, प्रतापगड, एलिचपूर, लोणार, मार्डी, त्र्यंबकेश्वर, नाशिक, पुणे, टाहाकारी, बेदर, घोडे, परळी—सज्जनगड, जेजूरी. सहज स्मरली तेवढी येथे दिली आहेत. पण पद्धतशीर प्रयत्न केला तर सध्याच्या महाराष्ट्रात वर सांगितल्याप्रमाणे अशी दोनशे स्थळे सहज सापडतील की ज्या ठिकाणांचे मुसलमानपूर्वकालीन हिंदू अवशेष तोडलेले आहेत.



मुसलमानी कालात मराठी स्थलनामांवर परिणाम झाला हे मी वर सांगितले आहे. पण त्याचा अधिक सत्याधिष्ठित आढावा घ्यावा म्हणून मी महाराष्ट्रातील काही ग्रामनामे नमुन्याकरिता तपासली. त्यासाठी महाराष्ट्र शासनाने प्रकाशित केलेली वर्णक्रमी किंवा महाराष्ट्रातील ग्रामनामांची सूचि हे एक चांगले साधन आहे. त्यातील अ, इ, ब आणि म ही अक्षरे मी तपासून पाहिली. ही घेण्याचे कारण एवढेच की, यांत सामान्यतः सर्वाधिक शब्द असतात. त्या वेळेस मला असे दिसून आले की, अ मधील शेकडा १०, इ मधील शेकडा २०, ब मध्ये शेकडा १०।। आणि म मध्ये शेकडा १२ नावे गंगाजमनी किंवा शुद्ध मुसलमानी आहेत. वर्णक्रमीमध्ये आज चालू नसलेली पण पूर्वी प्रचारात असलेली इस्लामी ग्रामनामे आलेली नाहीत. जसे पुण्याचे मुहियाबाद, मिरजेचे मुबारकाबाद किंवा मुर्तजाबाद, नाशिकचे गुलशनाबाद इ. अशा प्रकारची सध्या प्रचारातून गेलेली नावे विचारात घेतली तर महाराष्ट्रात इस्लामी सत्तेचा परिणाम म्हणून शेकडा किमान १३। नावे शुद्ध इस्लामी किंवा गंगाजमनी आहेत. अहमदनगर, अब्दुलनगर, इस्लामपूर, ही गंगाजमनी नावे आहेत. तर ताहराबाद, मुहियाबाद, गुलशनाबाद ही शुद्ध इस्लामी नावे आहेत. या नावांमध्ये मला असे दिसले की, उत्तरेतील बुलंदशहरसारखी शहर शब्दान्त नावे महाराष्ट्रात सहसा आढळत नाहीत. शुद्ध इस्लामी नावात आबाद शब्दान्त नावांचे फार मोठे बाहुल्य आहे. आता ही जी शुद्ध इस्लामी किंवा गंगाजमनी नावे आहेत तेवढी सर्व गावे मुसलमानी कालात मुसलमानांनी नव्याने वसविली असे नाही. यांतील शेकडा ७५ गावे तरी मुसलमानपूर्व कालातच वसलेली आहेत. पण मुसलमानी अमलात त्यांची नावे एकदा बदलली ती कायम राहिली. याची उत्तम उदाहरणे म्हणजे देवगिरीचे एकदा दौलताबाद झाले ते तसेच राहिले. खडकीचे औरंगाबाद हे नाव औरंगजेबामुळे पडले ते अद्याप कायमच आहे. धाराशीवचे नुकत्याच मेलेल्या निजामाने आपल्या नावावरून उस्मानाबाद हे नाव ठेवले ते ते नागरिकांच्या इच्छेविरुद्धही महाराष्ट्र शासनाने अद्याप चालूच ठेविले आहे. मिरज, पुणे, नाशिक इत्यादी अनेक गावांची जुनी मुसलमानी नावे पेशवाईत मागे पडली; पण हैदराबादच्या निजामी राज्यातील

(मोठ्या शहरांचीही) मुसलमानी नावे तशीच राहिली. आंबेजोगाईचे मोमिनाबाद हे मुसलमानी नाव अलीकडेच लोकाग्रहामुळे लोप पावत चालले आहे.

महाराष्ट्रातील स्थलनामांचा अभ्यास करून त्यावर इस्लामी सत्तेचा काय परिणाम झाला हे मी वर दाखविले. आता व्यक्तिनामांवर काय परिणाम झाला हे दाखवितो. स्थलनामांचा अभ्यास करताना ज्याप्रमाणे वर्णक्रमी उपयोगी पडली त्याप्रमाणे व्यक्तिनामांचा अभ्यास करण्यासाठी सर्वांत अधिक उपयुक्त साधन म्हणजे निवडणुकींच्या सूचि होत. अलीकडे प्रत्येक वयात आलेल्या स्त्रीपुरुषाला मतदानाचा हक्क मिळाल्यामुळे वयात आलेल्या सर्व स्त्रीपुरुषांची नांवे त्या यादीत सापडतील. आपण वयात आलेले स्त्रीपुरुष व न आलेले स्त्रीपुरुष हे दोहोस एक या प्रमाणात आहेत असे धरले तर महाराष्ट्राची लोकसंख्या ५०४००००० एवढी असल्यामुळे तीन कोटी छत्तीस लाख व्यक्तींची नांवे त्यात मिळतील. पण एवढी सर्व नांवे तपासून त्यातील इस्लामी संस्कृतीचा परिणाम असलेली नांवे शोधून काढणे अतिशय कालावधीचे काम आहे. या साधनाच्या खालोखाल उपयुक्त ठरणारे दुसरे साधन म्हणजे शालान्त परीक्षेला बसलेल्या विद्यार्थ्यांची नामसूची हे होय. ही नामसूची तपासणेही तीमध्ये सुमारे चार लाख नांवे असल्याने कालावधीचेच काम आहे. त्यासाठी सुद्धा चार हजार पृष्ठे सहज तपासावी लागतील. यामुळे या दोन्ही सूची मी तपासू शकलो नाही आणि विचार करीत बसलो असता काही व्यक्तिनामे मजपुढे आली. त्यांचाच परिपाक येथे मांडीत आहे. हा मांडीत असता आपण एक लक्षात ठेवले पाहिजे ते हे की, सध्याच्या महाराष्ट्रातील व्यक्तिनामांत ख्रिस्ती, यहुदी, पारशी, बोहरी, दालदी, खारवी इ. अनेक हिंद्वितर जमातींची नांवे आलेली असतील. मध्ययुगात या जमातींची नांवे येण्याचा फार संबंध नव्हता. त्या वेळी येथील मुख्य जमाती मुसलमान व हिंदू या होत. त्यांपैकी हिंदूंच्या नावांचा आपणास विचार करावयाचा आहे. व्यक्तिनामांत व्यक्तीचे नांव व आडनाव असे दोन भेद पडतात. या दोन्ही भेदांवर इस्लामी सत्तेचा परिणाम झाला आहे. पैकी



अधिक परिणाम आडनावांवर झालेला दिसतो. आडनावांचे दोन तीन प्रकार आहेत. एक प्रकार अधिकारवाचक नावांचा तर दुसरा प्रकार धंदेवाचक नावांचा. पैकी प्रथम अधिकारवाचक नावांचा विचार पुढे मांडतो. यांत दाश्तन् व नविश्तन् या फार्सी धातूंच्या दार व नवीस या धातुसाधितांपासून झालेली आणि वाला या मालकीहक्क दाखविणाऱ्या अरबी नामापासून झालेली नांवे येतात. या सर्व नावांचे परिगणन करणे वर सांगितल्याप्रमाणे फार कालावधीचे आहे. पण नमुन्याकरता काही नांवे येथे देतो.

दाश्तन् या फार्सी धातूचे अर्थ धारण करणे, ताब्यात असणे इत्यादि आहेत. त्यांवरून धारण करणारा, मालक इत्यादि अर्थ झाले. याची उदाहरणे अशी : अमलदार, इजारदार, ऐपतदार, कामदार, किल्लेदार, खजिनदार, खानेदार, चोपदार, चौकीदार, जकातदार, जप्तीदार, जमादार, जमीनदार, जागीरदार, जामदार, जिल्हेदार, जोमदार, ठाणेदार, डफे–डफेदार, दप्तरदार, दरकदार, दुनेदार, धनदार, नाकेदार, निषाणदार, नेकनामदार, पागेदार, पारिपत्यदार, पोतदार, फौजदार, मनसबदार, मिरासदार, मुजुमदार, शिरस्तेदार, शिलेदार, शे–सेकदार, सुभेदार, हकदार, हुद्देदार. नविश्तन् या फार्सी धातूचा अर्थ लिहिणे. त्याचे धातुसाधित नवीस व त्याचा अर्थ लिहिणारा. त्यापासून झालेली काही आडनावे अशी–अखबारनवीस, कापडणीस, कारखानीस, कोटणीस, खासनीस, गडणीस, चिटणीस, जमेनीस, तटणीस, पागनीस, पारसनीस, पोतनीस, फडणीस, वाकनीस, हजरनीस, सबनीस, सुरनीस, हशमनीस, हसबनीस. काही नावे केवळ उच्चता दाखविणारी आहेत जसे–अजमाने, अमीर, उमराव, खावंद, खासे, खासेराव, दरबारे, नामजादे, मेमजादे, रायजादे, मलिक, सरदार, सरजेराव, हंबीरराव. काही नावे फूल, फळ, वाद्य, हत्यार, शस्त्र इत्यादींवरून पडलेली आढळतात. जसे–अंजिरे, अंबारे, कलाम, खंजिरे, गुलाब, चिलखते, दवते, दवे, नारिंगे, निशाण, पडघम, बादले, महल्ले. काही आडनावे अधिकारवाचक किंवा शासकीय सेवावाचक आहेत. जसे–अत्तरदे, अमीन, आखरे, करोडे, कलमदाने, कारिंदे, कासिद, खुशामते, खोत, गनीम, गारदी, गुमास्ते, चाबुकस्वार, चुंगी,

जकाते, जंगी, जंजीरे, जबाने, जासूद, जोर, डबीर, तुरूक, दस्तुरे, दास्ताने, दिवाण, पठाण, पागे, पेशवे, प्यादे, बक्षी, बदरखे, बहादर, महाले, मामले, मिसाल, मिर्धे, मुकादम, मुतालीक, मुनशी, मेहतरे, मिराशी, मोगल, वकील, सरखेल, सरंजामे, हकीम, हरकारे, हेजीब. काही नावे अठरा कारखान्यांवरून पडलेली आहेत. जसे–अंबारखाने, छापखाने, तोफखाने, मोदीखाने, शिकारखाने इत्यादी. काही नावे धंद्यांवरून पडली आहेत. जसे–कलाल, चित्तेवान, जवाहिरे, जिनगरे, जौहरी, तबीब, तालीम, दलाल, बागवान इत्यादी. काही नावे स्थलांवरून पडली आहेत. जसे–आलमपुरे, औरंगपुरे. संकीर्ण स्वरूपाची काही नावे अशी–अखत्यार, इलमकार, खलजी, खैर, जगजाहिर, जालमखत्यार, तलके, तलखे, तांडेल, तुफाने, तुमाने, दावणे, दावलभक्त, दिमाखे, दवलतराव, नखाते, नादरे, फजिते, फटिंग, बकाल, बदसुरे, बाजारे, बादले, बाबर, बुजरूख, मखमले, माकुमिया, मिस्किन, रास्ते, रुमाले, लफंगे, शाहा, सतरंजे, सुलतान, हमाले, हिलाल, हुजुरबाजार, होशिंग, हंबीर इत्यादी. येथवर सहज जमा करता आली तेवढी मुसलमानी शब्दांची आडनावे दिली आहेत.

वर आडनावांची पुष्कळशी नोंद केली. आडनावांच्या मानाने व्यक्ति-नामे अतिशय थोडी जमा करता आली; तथापि ती येथे देऊन ठेवतो. अबू, अर्जोजी, अस्करराव, आबा, जानराव, दर्याबाई, दावलजी, दौलतराव, फत्तेसिंग, बसरोजी, बहादुरजी, बाजीराव, बाबू, बाबूराव, बुर्हाणजी, मकाजी, मिराजी–मिरांजी, शरीफजी, शहाजी, सर्जेराव, साबाजी, साहेबराव, सुभानजी, सुलतानजी, हिंमत बहादूर, हैबतराव. मराठे सरदारांना काही किताब मिळाले तेही असेच शुद्ध अरबी–फार्सी किंवा गंगाजमनी आहेत जसे–हिंमतबहादुर, कप्तनमुलुख, इ. यांशिवाय खंडोबा या देवतेला मल्लूखान व अजमतखान अशी दोन मुसलमानी नावे दिलेली आढळतात.

येथील इस्लामी सत्ताधाऱ्यांनी भारतीय साधू, संत, महंत व ग्रंथकार यांना साह्य न करता परदेशस्थ पण स्वधर्मीय साधू, संत, महंत व ग्रंथकार यांना कसा आश्रय दिला याची कित्येक उदाहरणे फिरिश्ता व



इतर इस्लामी ग्रंथकार यांनी दिली आहेत. त्यांना येथील इस्लामी सत्ताधाऱ्यांकडून सर्व प्रकारचा आश्रय मिळाला आणि कधी कधी या सत्ताधाऱ्यांनी त्यांशी विवाहादी संबंधही जोडले. त्यांतील दोघांविषयींची माहिती विशेष मनोरंजक असल्याने येथे देतो. इराणमध्ये किर्मान म्हणून एक प्रदेश आहे. त्याचे मुख्य शहर किर्मान. तेथे निअमतुल्लाह या नावाचा एक संत होता. बहमनी सुलतानांपैकी एक अहमद वली याच्या मनात भरले की, त्या संताला इकडे आणून आपल्या सत्य धर्माचा प्रसार करण्यास विनवावे म्हणून त्याजकडे महाराष्ट्रातून एक शिष्टमंडळ या सुलतानाने पाठविले आणि आपला मुलगा खलीलुल्लाह यास भारतात पाठविण्या-विषयी विनविले. पण तो त्याचा एकुलता एक मुलगा असल्यामुळे निअमतुल्लाहने त्यास पाठविण्याचे नाकारले. तेव्हा शिष्टमंडळाने आपला नातू नूरुल्लाह यास पाठविण्याची विनंती केली. ते त्याने मान्य केले. शिष्टमंडळ त्याला घेऊन महाराष्ट्रात आले तेव्हा उपर्युक्त सुलतान त्यास सामोरा गेला आणि त्याच्या योगक्षेमाची व धर्मप्रसाराची सर्व सोय त्याने लावून दिली. हे उदाहरण पुष्कळ बोलके आहे. पण याहून बोलके उदाहरण एका कवीचे आहे. इराणमध्ये शीराझ या नावाचे एक नगर आहे. तेथे एक सूफी कवी रहात होता. त्याचे नाव हाफिझ शीराझी. येथील एक बहमनी सुलतान दुसरा मुहम्मद याने त्या कवीला येथे बोलावून त्याजकडून येथील प्रजेमध्ये सत्य ज्ञानाचा प्रसार करावा या हेतूने त्याजकडे एकव्यक्तिक शिष्टमंडळ पाठविले. तो मोठ्या नाखुषीने महाराष्ट्रात येण्यास तयार झाला आणि होर्मझ या इराणी आखातातील एका बंदरापर्यंत आला. तो महाराष्ट्रात येण्यासाठी जहाजावर चढणार त्या दिवशी तेथे एकदम वादळ झाले. त्यामुळे तो एवढा भ्याला की, इकडे येण्याचे रहित करून तो आपल्या गावी परतला. पण होर्मझ बंदरापर्यंत येण्यात त्याने जे विलक्षण कष्ट घेतले त्याची भरपाई अवश्य केली पाहिजे, या भावनेने त्यास एक हजार सुवर्ण टंक देऊन शिवाय त्याच्या प्रवासाचा खर्चही त्यास दिला. याच विद्वान कवीला बंगालच्या एका सुलतानानेही असेच निमंत्रण दिले होते.

महाराष्ट्रातील मुसलमानकालीन हिंदू साधू, संत, महंत व ग्रंथकार यांस कोणता आश्रय मिळाला ? एकनाथ महान संत व विद्वान कवी होते. असे म्हणतात की, त्यांच्या अंगावर एक फकीर (मुस्लिम भिकारी) सात वेळा थुंकला आणि एकनाथांनी सात वेळा गोदावरीत स्नान केले. पुढे त्या फकिरास पश्चाताप होऊन तो त्यांस शरण गेला. पण तत्कालीन सत्ताधिकाऱ्याने त्या फकिराविरुद्ध कोणतीही कारवाई केल्याचे इतिहासात नमूद नाही. गुरुचरित्राचे नायक नरसिंह सरस्वती यांजविषयी एक आख्यायिका आहे. त्यांनी बहमनी सुलतान अलाउद्दीन याच्या पायाचा फोड बरा केला म्हणून त्यांचा सत्कार करावा या उद्देशाने त्याने त्यांस आपल्या बीदर राजधानीस बोलाविले. त्यांनी 'तुझ्या राज्यात गोवधबंदी कर तर मी येतो' अशी अट घातली. ही अट मात्र त्याने मान्य केली नाही आणि फिरिश्त्याने अलाउद्दीनच्या पायास झालेला फोड बरा न होता त्या दुखण्यातच तो मेला, म्हणून सांगितले आहे. यावरून इस्लामी सत्तेच्या कालात हिंदू साधू, संत, महंत व ग्रंथकार यांची स्थिती कशी होती हे सहज लक्षात येईल.

महाराष्ट्रात मुसलमानी अंमल सुरू झाल्यानंतर, शास्त्यांच्या भाषा तुर्की अरबी, फार्सी इत्यादी असल्यामुळे शासितांच्या भाषेवर त्या भाषांचा, परिणाम होणे साहजिक होते. प्रथम प्रथम मराठी व वरील तीन भाषा यांच्या मिश्रणाने एक धेडगुजरी किंवा खडी बोली नावाची बोली उत्पन्न झाली. तीमध्ये मुख्यतः लष्करी व राज्यकारभारविषयक शब्द आले. आरंभी ती कामचलाऊ होती; पण बऱ्याच कालानंतर तीमध्ये थोडे थोडे वाङमय उत्पन्न होऊ लागले. वाङमय उत्पन्न झाल्यानंतर तिला दख्खनी हिंदी किंवा दख्खनी उर्दू म्हणू लागले. तीमधील वाङमय तपासले तर ती भाषा विजापूर, गोवळकोंडे, इत्यादी भागांत चालू होती तरी तीत कानडी किंवा तेलुगु भाषांतील शब्दांचा विशेष भरणा झालेला दिसत नाही. ती भाषा मुख्यतः तुर्की, अरबी, फार्सी व मराठी या चार भाषांच्या मिश्रणाने तयार झालेली दिसते.

त्यांतही शास्त्यांच्या फार्सी भाषेचा शासितांच्या मराठीवर फार मोठा परिणाम झालेला आढळून येतो. या फार्सीतून केवळ शेकडो शब्द



मराठी भाषेत आले असते तर त्यामुळे फारसे बिघडले नसते. पण फार्सीचे मराठीवरील आक्रमण एवढयानेच थांबले नाही. शब्दांबरोबर काही वाक्प्रचारही आहे, काही संयुक्त क्रियापदे मराठीत घुसली व कधी फार्सीच्या धर्तीवर मराठी वाक्यरचना होऊ लागली. अशा प्रकारे आक्रमण होता होता शिवपूर्वकालात सामान्यतः राजकीय पत्रव्यवहारात फार्सीचा मराठीवर एवढा मोठा परिणाम झाला की, एखादे राजकीय पत्र फार्सी आहे की मराठी आहे हे ओळखणेही प्रसंगी कठिण होऊ लागले. मी शिवपूर्वकालीन एका सरकारी पत्राची तपासणी केली असता मला असे आढळून आले की, त्या पत्रात असलेल्या दीडशे शब्दांपैकी एकशे चव्वेचाळीस शब्द अरबी, फार्सी, तुर्की या भाषांतील आहेत. सारे सहा शब्द मराठी आहेत. यामुळेच पेशवेकालीन मराठी भाषेपेक्षा शिवकालीन किंवा अधिक अचूक म्हणजे शिवपूर्वकालीन मराठी भाषा समजणे चांगल्या सुशिक्षितांनाही कठिण जाते. खास अभ्यास केल्याशिवाय आणि उपर्युक्त तीन भाषांतील शब्दांच्या मूळ व विकृत अर्थांचे स्मरण ठेवल्याशिवाय ती समजत नाही.

मुसलमान–कालीन मराठी संतांनी सामान्य लोकांना केलेला उपदेश किंवा आत्मसंतोषासाठी लिहिलेले ग्रंथ मुख्यतः मराठी भाषेत आहेत. या उपदेशातील व ग्रंथांतील मराठी भाषा राजकीय पत्रव्यवहारातील भाषेएवढी भ्रष्ट झालेली दिसत नाही. संतांच्या मराठी भाषेचे स्वरूप पुष्कळच सोज्ज्वळ व संस्कृतनिष्ठ राहिलेले दिसून येते. मराठी संतांनी महाराष्ट्रीय समाजासाठी किंवा अधिक बरोबर म्हणजे अखिल हिंदू समाजासाठी, एवढेच नव्हे तर मानवतावादी जागतिक समाजासाठी अनेक उपक्रम केले. त्यांतून वर सांगितल्याप्रमाणे त्यांनी मराठी भाषेचे सोज्ज्वळ स्वरूप कायम राखिले; एवढेच नव्हे तर तत्कालीन शासनाचे कोणतेही प्रोत्साहन नसताना किंवा काहीसा विरोध असताना मराठी भाषा आपल्या ग्रंथरचनेने समृद्ध केली हेही लक्षात घेण्यासारखे आहेत. यामुळेच मराठी माणसाच्या ठिकाणी आपली मातृभाषा, आपली संस्कृती याविषयींची अस्मिता कायम राहिली. या अस्मितेतूनच शिवाजी महाराजांना स्वराज्य

स्थापून 'राजयव्यवहारकोष' करण्याची स्फूर्ती झाली आणि सत्तेमुळे ते सहज होऊ शकले.

शिवाजी महाराजांनी राज–व्यंवहार–कोष करून मराठी भाषेतील अरबी, तुर्की, फार्सी शब्द हाकलून देण्याची बुद्धिपुर:सर व्यवस्था केली. त्याप्रमाणे त्यांनी 'राज्याभिषेक शक' या कालगणनेचा उपक्रम करून राजकीय पत्रव्यवहाराचे स्वरूप आमूलाग्र बदलून टाकण्याचा प्रयत्न केला. राज्याभिषेकानंतर त्यांनी धाडलेल्या अनेक पत्रांवरून ही गोष्ट स्पष्ट होते.

गोव्यामध्ये ख्रिस्ती सत्ता स्थापन झाल्यावर तदन्तर्गत पाद्रयांनी ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्याचा पद्धतशीर व कसून प्रयत्न केला. पोर्तुगीजांनी सागरावर आपले अत्यंत प्रभावी वर्चस्व स्थापिले होते. यामुळे समुद्र, त्यावर चालणाऱ्या विविध प्रकारच्या होडचा, तत्संबंधी उपयोगात येणारे अनेक शब्द मराठीत आले. पोर्तुगीजांपूर्वी किंवा मुसलमानपूर्वकालात आमचेकडे नौकानयन अजिबात नव्हते असे नाही; विशेषत: इसवीच्या आठव्या नवव्या शतकापर्यंत महाराष्ट्रातील व भारतातील हजारो लोक नौकानयन करून जावा, सुमात्रापर्यंत देशी नावा घेऊन जात. त्यांच्या साहाय्याने परदेशी व्यापारही करीत. पण तदनंतर समुद्रगमन निषिद्ध मानले जाऊ लागल्यामुळे आमचे नौकानयन मागे पडले आणि प्रथम मुसलमानांचे व नंतर पोर्तुगीजादी इतर युरोपीय सत्तांचे नौकानयन पुढे सरसावले. ते इतके की, शिवकालीन नौकानयनातील बहुसंख्य पारिभाषिक शब्द पोर्तुगीज किंवा मुसलमानी भाषांतील आहेत. असे असले तरी पोर्तुगीज पाद्री शासितांना पोर्तुगीज शिकण्याचा आग्रह न करता स्वत:च तत्कालीन मराठी भाषा शिकून तिच्या द्वारेच आपल्या धर्माचा शासितांमध्ये प्रसार करण्याचा प्रयत्न करीत. स्टीफन्सचे ख्रिस्तपुराण किंवा दोला गीते व इतर अनेक स्फुट प्रकरणे ही त्याचीच गमके आहेत. सारांश, पोर्तुगीजांच्या परकी सत्तेमुळे त्यांच्या भाषेचा गोव्यातील मराठी भाषेवर फार मोठा परिणाम झाला नाही.

मध्ययुगीन महाराष्ट्रात मुसलमानी अमदानीतील अनेक प्रकारच्या वास्तू शास्त्या मुसलमानांनी व शासित हिंदूंनी उभारल्या. या वास्तूंचे



धार्मिक व लौकिक असे दोन भाग पडतात. लौकिकात पुन्हा लष्करी व मुलकी किंवा सैनिकी व नागरी अशी विभागणी होते. मध्ययुगीन महाराष्ट्रात शास्त्यांच्या धार्मिक वास्तू म्हणजे मशिदी, ईदगे, चर्चे, दर्गे इ. होत आणि लौकिक म्हणजे कबरी व त्यांवर उभारलेले घुमट, सराया, पाठशाला इ. या काळात मुसलमान व ख्रिश्चन सत्ताधाऱ्यांच्या जुलमामुळे शासित हिंदू सामान्यत: देवळे, घाट इ. वास्तू उभारू शकले नाहीत. उलट देवळे, समाधि, पाठशाळा इ. ची या सत्ताधाऱ्यांनी नासधूस केली किंवा त्यांना आपल्या धार्मिक स्थानांचे रूप दिले. यामुळे या कालातील शासित हिंदूंनी उभारलेली देवळे सामान्यत: नाहीत. या काळात हिंदूंचे मठ स्थापन झाले; पण त्यांना अर्धधार्मिक व अर्धलौकिक असे स्वरूप होते. क्वचित प्रसंगी एखादे दुसरे देऊळ उभारले गेले असेल; पण त्याचे स्वरूप, कलाकुसर किंवा मूर्तींची शोभा याविरहित, असल्याचे आढळते. मुसलमानी धर्मात मूर्तिपूजेचा निषेध केला आहे व त्या निषेधाची कार्यवाही मुसलमानी सत्ताधारी अत्यंत काटेकोरपणे करीत होते. यामुळे एत्कालीन देवळांचे स्वरूप अत्यंत साधे आढळते.

लौकिक वास्तूंत किल्ले, गढचा, वाडे, घुमट, सराया, पाठशाळा इ. चा समावेश होतो. मुसलमानी कालात तत्पूर्वकालातील किल्ले व गढचा यांचे तर जीर्णोद्धार झालेच; पण नवीन वास्तूही उभारल्या गेल्या. या कालात जे छोटे छोटे हिंदू संस्थानिक होते – मग ते सत्ताधाऱ्यांशी मिळते घेणारे असोत किंवा यांचे विरोधक असोत – त्यांनी जरी किल्ले उभारले नाहीत तरी गढचा मात्र उभारलेल्या होत्या. त्याचप्रमाणे सत्ताधाऱ्यांच्या अनुकरणाने सत्ताधाऱ्यांप्रमाणेच पण लहान प्रमाणावर वाडे, घोडचांच्या पागा, पीलखाने इ. वास्तूही उभारलेल्या होत्या. त्यांपैकी मुसलमान सत्ताधाऱ्यांचे वाडे पडून जमीनदोस्त झाले; पण देशमुख, देशपांडे व संस्थानिक यांनी उभारलेले वाडे अजूनही अनेक ठिकाणी, त्यांचा मधून मधून जीर्णोद्धार झाला असला तरी, अस्तित्वात आहेत. महाराष्ट्रातील देशमुख–देशपांडे यांची वतने लहानलहानच होती; पण महाराष्ट्राच्या लगतचा आंध्र व कर्नाटक या प्रदेशांतील देशमुख–देशपांडे किंवा तत्सम अधिकारी हे कधीकधी सध्याच्या अर्ध्या अर्ध्या जिल्ह्याचे

वतनदार होते आणि त्यांचे वंश शिल्लक राहिल्याने त्यांच्या वास्तूही शिल्लक राहिल्या आहेस.

मुसलमानांनंतर सुमारे दोनशे वर्षांनी पोर्तुगीज महाराष्ट्राच्या पश्चिम किनाऱ्यावर गोव्यापाशी उतरले. सुमारे दोनशे वर्षांच्या अवधीत त्यांनी भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील अनेक ठिकाणे हस्तगत करून तेथे किल्ल्यासारख्या लष्करी व चर्चसारख्या नागरी वास्तू उभ्या केल्या. त्यानंतर मराठ्यांनीही किल्ले व नागरी वास्तू उभारल्या. पण या पोर्तुगीज वास्तूंचा भक्कमपणा मराठी वास्तूंत येऊ शकला नाही. मराठ्यांच्या किल्ल्यांच्या तटावर किंवा तटाच्या मध्यात झाडे उगवून त्यांनी तट ढासळून टाकले. पण पोर्तुगीजांच्या वास्तू अशा प्रकारे कोठेही ढासळलेल्या आढळत नाहीत. वसईच्या किल्ल्यासाठी मोठे रणकंदन झाल्यामुळे त्या किल्ल्याची पडझड व पुनर्बांधणी झालेली आढळते. पण तारापूर, माहीम, केळवे, रेड्डी, इत्यादी ठिकाणच्या किल्ल्यांचे अवशेष पाहिले म्हणजे पोर्तुगीजांच्या वास्तुरचनेतील सरस ज्ञानाचा प्रत्यय येतो. त्याचप्रमाणे इंग्रजांची राजापूरची वखार किंवा मुंबईची मिंट या इमारती पाहिल्या म्हणजेही तोच प्रत्यय येतो. त्यांच्या संसर्गानेही आम्ही वास्तु-रचनेच्या सुधारलेल्या पद्धती व त्यास लागणारे सामान याविषयी फारसे शिकून घेतले नाही. शिवाजी महाराजांनी किल्ले बांधण्यासाठी पोर्तुगीजांकडे अभियंते मागितले होते. याचाही अर्थ तोच आहे. आमच्या पूर्वजांनी शिवपूर्वकाल किंवा शिवकाल यात उभारलेले स्तंभविरहित विशाल घुमट किंवा हलते मनोरे पाहिले नसतील असे नाही; पण आम्ही आमच्या मंदिरांचे गाभारे किंवा सभामंडप स्तंभविरहित व विशाल करू शकलो नाही. हलत्या मनोऱ्याच्या तत्त्वावर खानदेशात पारोळ्याजवळ म्हसवे या गावी हलती दीपमाळ आहे ती अपवादात्मकच समजली पाहिजे.

अष्टादशप्रकृति हा शब्दसमूह फार प्राचीन आहे. त्याचा अर्थ अठरा प्रकारच्या प्रजा असा आहे. त्यावरूनच अष्टादशप्रकृति जात किंवा मराठीतील अठरा पगड जाती हा शब्दप्रयोग तयार झाला. बदामीच्या चालुक्य घराण्यातील दुसऱ्या पुलकेशीच्या लक्ष्मेश्वर येथील लेखात



'अष्टादशप्रकृतिगळ कोट्ट शासनव्यवस्थे' असा शब्दप्रयोग आला आहे. पण अष्टादशप्रकृति हा शब्दप्रयोग कौटिल्याच्या अर्थशास्त्रातही आल्याचे स्मरते. अत्यंत प्राचीन काळी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र आणि अंत्यज किंवा चांडाल असे पाच वर्ण असले तरी स्मृतिग्रंथांपैकी सर्वांत प्राचीन मनुस्मृतीत अनुलोम व प्रतिलोम विवाहपद्धतीमुळे, तसेच सधवा व विधवा यांशी अनैतिक वैषयिक संबंध ठेवल्यामुळे अनेक प्रकारच्या जाती उत्पन्न झाल्याचे दाखविले आहे. ह्या जातींना निरनिराळे धंदेही लावून दिल्याचे सांगितले आहे. याच विविध लोकांना हळूहळू कारू–नारू किंवा बलुते–अलुते या संज्ञा मिळाल्या. पैकी कारू–नारू ही संज्ञा मुसलमानपूर्वकालीन आहे. तर बलुते–अलुते ही संज्ञा मुसलमानपूर्वकालीन नसावी असा माझा ग्रह आहे. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांच्या स्वभावज कर्मांत पुष्कळच भेसळ मुसलमानपूर्वकालात झाली होती. उदा. शेती, गुरेढोरे पाळणे, व्यापार उदीम करणे ही तीन कर्मे वास्तविक वैश्यांची असताना तिन्ही वर्णांचे लोक घरी मजूर ठेवून तिन्ही प्रकारची कामे करीत होते. व्यापारउदीम या शब्दात निरनिराळे धंदे येतात. उदा. सोनार, सुतार, लोहार या जमातीचे धंदे घ्या. हे धंदे वैश्य कर्मांत मोडत होते. एवढेच नव्हे तर तेल्याचा धंदाही वैश्य कर्मांत मोडत होता. हे सर्व यज्ञोपवीत घालणारे लोक होते व त्यांपैकी अजूनही काही लोक यज्ञोपवीते घालतात. खानदेशात तेल्यांनी मुंज झाल्यानंतर मेलेल्या मुंजांची स्मारके म्हणून हातात दंड घेतलेल्या बटूंची शिल्पे खोदविलेली आहेत. सातारा जिल्ह्यात ज्यांना आम्ही सामान्यतः कुणबी म्हणतो तेही श्रावणी पौर्णिमेच्या दिवशी नैमित्तिक का होईना यज्ञोपवीत घालताना दिसतात. मुसलमानी कालाच्या अगदी लगतच्या कालात झालेल्या पद्मानंद महा-काव्यात कारू नारू शब्दाचा निर्देश आला आहे. लोहार हा वैश्य वर्गात मोडला तरी त्याचेच काम करणारा घिसाडी हा वैश्य वर्गात मोडत नव्हता असे वाटते. चामडयाशी काम करणारा चांभार हा अर्धा स्पृश्य बनला; पण तेच काम करणारा होलार हा पूर्ण अस्पृश्य व चांभाराच्याही योग्यतेचा ठरू शकला नाही.

मुसलमानी अमदानीत या अठरा पगड जाती तर होत्याच; पण त्यांत आणखी काही जाती–जमातींची भर पडली आणि त्यांपैकी काही बलुतेदारांत समाविष्ट झाले. ब्राह्मणांच्या षट्कर्मांत कालक्रमाने आणखी काही कर्मे उत्पन्न झाली. वैदिक कालात शुभ दिन, शुभ मास, शुभ नक्षत्र पहात नव्हते असे नाही. पण त्यांचा उपयोग फक्त कर्मारंभी करीत. उठल्याबसल्या त्यांचा उपयोग करीत होते असे वाटत नाही. पण फलज्योतिषाचा प्रसार होत गेला तसतशी ज्योतिष्यांची अधिकाधिक आवश्यकता भासू लागली. यामुळे ब्राह्मणांमध्ये जोशी म्हणजे ज्योतिष्याचे काम करणारा एक वर्ग तयार झाला. तो खेडेगावात गेला तेव्हा तेथे तो ग्रामजोशी बनला. त्याजकडे पंचांग सांगणे, ब्राह्मणेतरांकडील लग्ने लावणे, त्यांसाठी मुहूर्त सांगणे, लग्नादी विधींच्या वेळी मुहूर्त साधण्यासाठी घटका घालणे इत्यादी कामे तो करू लागला. पूर्वी घडयाळे नव्हती. भारतात वाळूचे घडयाळही अलिकडेच आले असावे. सामान्य मनुष्य सूर्य व चांदण्या यांच्या गतीवरून वेळ किती झाला याचा अंदाज करी; पण मोठमोठया कचेऱ्यांत जेथे पुष्कळ लोक एकत्र येऊन काम चाले तेथे कायमचा घटकापात्र चालविणारा जोशी असे. त्याला दिवाण जोशी म्हणत. काही ठिकाणी ज्योतिषाचे काम करण्यासाठी राजाने आपल्या पदरी ज्योतिषी ठेवले होते. त्यांना राज–ज्योतिषी म्हणत. पण काही झाले तरी दिवाणजोशी व राजजोशी यांची संख्या कमीच होती. त्या मानाने खेडयांत पसरलेल्या प्रजेची संख्या फार मोठी असल्यामुळे व ग्रामजोशी त्यांना पंचांग, मुहूर्त इत्यादीसाठी नित्य लागत असल्यामुळे त्याचा समावेश क्रमशः बलुतेदारांत झाला.

बलुतेदारांत नव्याने समाविष्ट झालेला आणखी एक वर्ग म्हणजे मुलाणी. मुसलमानपूर्व कालांत यज्ञयागादींत बकऱ्यांची हत्या होई. पण तीसाठी पुष्कळच विधी करावे लागत. शिवाय, त्या काळात कोंबडा, पारवा इत्यादी पक्षी विधिपूर्वक मारण्याचा प्रघात नसावा. मुसलमान हिंदूंच्या मानाने अधिक मांसभक्षक होते. तेव्हा त्यांच्या काळात अधिक कोंबडी, बकरी इत्यादी मारली जाऊ लागली. ती हिंसा होती हे खरेच. पण त्या हिंसेला सोज्वळ रूप देण्याची आवश्यकता उत्पन्न झाली. यज्ञयागादी खर्चिक



व दिवसगत लागणाऱ्या विधींनी ती गरज भागविणे अशक्य झाले. झटपट पण विधियुक्त हत्या करणारा माणूस पाहिजे होता तो मुलाण्याच्या रूपाने मिळाला. हा कोंबडी, बकरी मारण्यापूर्वी एक लहानसा मंत्र म्हणून त्या हिंसेला सोज्ज्वळ रूप आणून देई. त्या मंत्रावरूनच ‘कांद्याला बिसमिल्ला कशाला’ हा वाक्प्रचार मराठीत रूढ झाला. हा मंत्र म्हणणारा मुलाणी लोकांमध्ये साहजीकच लोकप्रिय झाला. आणि त्याला बलुतेदारांत स्थान मिळाले. पण याबाबत एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे ती ही की, प्रत्येक गावात मुलाणी असेलच असे नाही. आणि प्रत्येक गावातील प्रत्येक कुटुंब त्याजकडून काम करून घेत असेलच असेही नाही. न्हावी, सुतार, लोहार इत्यादींसारखा महत्त्वाचा बलुतेदार तो कधीच बनला नाही. मुसलमानपूर्वकाली आपल्याकडे खाटीक, कसाई होतेच; पण त्यांत बकरकसाब व गायकसाब असे आणखी दोन समाविष्ट झाले. समुद्रावर काम करणारे कोळी, भंडारी होतेच; पण मुसलमानी कालात दाल्दी व खारवी अशा दोन मुस्लिम व हिंदू जमाती उत्पन्न झाल्या. शिवाजी महाराजांच्या उपस्थितीत झालेल्या एका महजरांत ३८ जमातींचे २६४ लोक बसले होते. या सर्व जाति–जमातींचे आपसांत बेटीव्यवहार तर होत नव्हतेच; पण रोटीव्यवहारही एवढया संकुचित स्वरूपात होई की, तो प्रायः नव्हताच म्हटला तरी चालेल. रंगारी शिंपी व शिवणारे शिंपी अलीकडेच बेटीव्यवहार करू लागले. पूर्वी रोटीव्यवहारही करीत नव्हते. बेटीव्यवहारात जात सांभाळण्यासाठी एक ढोबळ पण पक्का नियम पाळीत. ज्याची मुलगी करावयाची त्याशी लांबूनच का होईना, पण पूर्वीचे, नाते लागते का ते पहात व ते जुळले तर निर्धास्तपणे लग्न करीत. ब्राह्मणाला इतर स्पृश्य जमातींमधून आलेले दूध, लोणी, दही, तूप, तेल चाले. मराठ्यांना धनगरांकडील ताक चाले. पण शिजविलेले अन्न चालत नसे. पाण्याविषयी मराठा समाजात कडक निर्बंध नव्हता. पण अन्नाविषयी होता. सोन, महादेव, डोंगर, लाललंगोटी, राज, मेट व मत्स्य–व्यवसायी कोळी आपसांत फार तर रोटीव्यवहार करीत असतील. बेटीव्यवहार नाही. जाती–जमातींची रोटी–बेटी व्यवहाराची सामान्य परिस्थिती अशी होती.

मध्ययुगीन अर्थव्यवस्था कशी होती हे नीट सांगणे कठीण आहे. त्यावेळचे बाजारभाव, व्याजबट्टा, सावकारी व इतर धंदे, इत्यादींविषयी आकडेवार माहिती उपलब्ध नाही. पण येवढे म्हणता येईल की, त्यावेळी महाराष्ट्रात यंत्रयुग चालू झाले नसल्याने भांडवलदार व मजूर असे वर्ग उत्पन्न झाले नव्हते. व वर्गकलहही नव्हते. क्वचित जातिकलह होत. पण जबरीची धर्मांतरे व त्यांतून उद्भवलेली भांडणे असत. व्यापारी वर्ग सर्वाधिक श्रीमंत होता. त्या खालोखाल सत्ताधारी राजे व त्यांचे सरदार. नंतर मग इतर लोक. व्यापारी राजे व सरदार यांना कर्जे देण्याएवढे श्रीमान असत. यामुळे यांचे व बौद्धिक कामे करण्यामुळे ब्राह्मण व तत्सदृश वर्ग यांचे राजदरबारी वजन असे. तथापि, बौद्धिक काम करणारा वर्ग श्रीमंतीत बेताचाच असावा. त्यातल्यात्यात देशमुख, देशपांडे व शेटे महाजन सुस्थित असावे. इतर लोक गरीबांत मोडणारेच होते.

बंधूनो व भगिनींनो, मी परवा, काल आणि आज आपणांपुढे तीन व्याख्याने देऊन महाराष्ट्राचे मध्ययुगीन म्हणजे मुसलमान–सत्तेच्या वेळचे चित्र रेखाटण्याचा प्रयत्न केला. हे चित्र सर्वांगांनी परिपूर्ण नाही, याची मला तुम्हा सर्वांपेक्षा अधिक जाणीव आहे. पण एकतर तसे चित्र रेखाटण्यास पुरेशी, विश्वास्य व समकालीन, सामग्री नाही. आहे तीमधून शास्त्यांविषयी माहिती मिळते. शासितांविषयी मिळत नाही. तीसाठी न कंटाळता अतिशय दीर्घ प्रयत्न करावा लागेल. तो प्रयत्न मी करीत आहे. त्याची वानगी म्हणून ही तीन व्याख्याने आहेत. याच विषयावरील माझा ग्रंथ प्रकाशित झाला म्हणजे माझा प्रयत्न कितपत यशस्वी झाला हे समजेल. आपण माझी ही वानगीची तीन व्याख्याने शांत चित्ताने ऐकून घेतली आणि विदर्भ संशोधन मंडळाने ती देण्याची संधी मला दिली या बद्दल दोघांचेही हार्दिक आभार मानतो व माझे तिसरे व्याख्यान संपवितो.

———

## शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १ | १३ | ऐने अकबरी | आईन–इ–अकबरी |
| ५ | ५ | तज्किरतुत्मुल्क | तज्किरतुलमुलूक |
| ५ | १४ | शमझुल्लाह | शम्सुल्लाह |
| ५ | १७ | बुहीन–इ–मासीर | बुर्हान-इ–मासिन |
| ६ | ५ | फुतुहाते | फुतूहाते |
| ६ | १० | जादुनाथ | जदुनाथ |
| ९ | १६ | लेखशाखेतील | लेख्यशालेतील |
| १० | २ | रोक | शोक |
| १० | २१ | रियाजुलइन्शा | रियाजुल्इन्शा |
| ११ | १६ | राघावाधवविलाखचंपू | राधामाधवविलासचंपू |
| ११ | १९ | कागद–ग्रंथ | काव्यग्रंथ |
| १४ | १८ | तबातबा | तबातबाई |
| १५ | ९ | इस्माइल | इस्माईल |
| २० | ९ | शम्सुड्डीन | शम्सुद्दीन |
| २४ | १८ | नमशीद | जमशीद |
| २५ | १० | आदिलशाही या दोन शाह्यांशी | आदिलशाही व निजामशाही या दोन शाह्यांशी |
| २८ | १० | कुत्वशाही | कुत्बशाही |
| ३० | १३ | समाज | समज |

